जमवून, पहिल्यानें त्या किल्ल्यावर जाण्याचा रस्ता खोदवून साफ करून घेतला; कीं, तेणेंकरून, त्या किल्ल्यावर कोणालाही जाण्यास आणि आपलें सामान वर पोंचविण्यास यातायात पडूं नये, आणि, येणेंप्रमाणें, थोड्याच दिवसांत त्यानें किल्ल्याचें काम पुरें करून व त्यावर तोफा वगैरे चढवून, एकलिंगगडावरून राण्याला सलामी दिली.

याप्रमाणें, उदेपूरच्या संरक्षणाची व्यवस्था बहुतकरून झाली. त्याच्या तिन्ही बाजूंकडून उत्तम प्रकारचा बंदोबस्त करण्यांत आला. पश्चिमेच्या बाजूस जें सरोवर आहे त्यांतून शहरांत येण्याजाण्याचा मार्ग ठेविला; आणि, सरोवराचे पलीकडे अरवली डोंगरांतले राजनिष्ठ आणि विश्वासू भिल्ल लोक, त्यांना खाण्यापिण्याचा उत्तम प्रकारचा पुरवठा करून, संरक्षणासाठीं ठेविले. परंतु, उदेपुरचा अंतस्थ बंदोबस्त आणि संरक्षण राण्यानें ठेवलेल्या नवीन सिंधी लोकांच्या प्रामाणिकपणावरच काय तें अवलंबून होतें. आणि, ते तर, ह्या, वर सांगितलेल्या शिंद्याचे व तोतयाचे स्वारीच्या वेळीं, फारच बेफाम होऊन, त्यांनीं राण्याशीं मोठ्या उद्धततेचें वर्तन चालविलें. त्यांनीं याच वेळीं राण्याकडे आपल्या पगाराच्या बाक्या मागून त्यास आडवून धरलें; आणि त्याचे भोंवतीं एकच कल्लोळ करून दिला. राण्याकडून त्यांस रोज, आज पगाराचे पैसे देऊं, उद्यां पगाराचे पैसे देऊं, अशीं गुळमुळीत उत्तरें मिळत गेल्यावरून, त्यांच्या समोर कोणकोणत्या गोष्टी घडत होत्या व तो प्रसंग कसा होता इकडे बघूनही, त्यांना राण्याचे संबंधानें अभिमान, पूज्यभाव आणि तो प्रसंग टाळण्याविषयींचा उत्साह हीं ह्मणून बिलकुल उत्पन्न झालीं नाहींत. पुढें पुढें तर, ते राण्याजवळ नुसत्या मागण्या करूनच राहिले नाहींत, तर, एके दिवशीं राणा आपल्या महालांत जात असतां, त्या लोकांतील कित्येक पुढारी होऊन महालाचे दाराशीं जमून उभे राहिले आणि राणा आंत जातो आहे तोंच त्याच्या झग्याचा पदर त्यांनीं खेचून धरून त्याला सांगितलें कीं, 'ह्या वेळीं आमच्या बाक्या चुकत्या केल्याशिवाय आह्मी आपल्याला महालांत जाऊं देणार नाहीं.' त्या दांडग्या लोकांनीं राण्याचा झगा इतका ओढून धरिला कीं, तो त्या ओढीनें फाटला देखील. इतक्या थरावर गोष्ट येऊन ठेपली तेव्हां त्याला तो मोठा अपमान वाटून त्याचें मस्तक फिरून गेलें. परंतु करतो काय? त्यावेळीं त्याला आपला राग दाखविण्यासारखें सामर्थ्य होतेंच कोठें! त्यासमयीं तेथें त्याचा धांभाई[1] (दूधभाऊ) जवळ होता. त्यानें त्याला अशी

१. 'धांभाई' हा शब्द 'दूधभाई' या शब्दाचा अपभ्रंश होऊन झालेला आहे. दूधभाई किंवा दूधभाऊ ह्मणजे ज्या दाईचें दूध पिण्यांत आलें असेल त्या दाईचीं जीं दुसरीं मुलें असतात त्या परस्परांचें जें नातें तें दूधभावाचें नातें होतें. त्याप्रमाणें राणा उरसी याचा एक दूधभाऊ होता. त्याला त्यानें झाला संस्थानचा अधिकार दिला होता व तो राण्याच्या मंत्रीमंडळापैकीं एक मंत्री होता. व मुख्य प्रधानकी रघुदेव ह्मणून एक मनुष्य होता त्याकडे होती.

मसलत दिली कीं, 'पश्चिम बाजूनें सरोवरांतून पलीकडे पळून जावें; आणि डोंगरांतून मंडलगडास पोंचावें, ह्मणजे आपल्या जीवास कोणत्याही प्रकारचा धोका होणार नाहीं.' परंतु ही मसलत साळुंब्याच्या टाकुरास बिलकुल पसंत पडली नाहीं. तो ह्मणाला, 'ह्या वेळीं अमरचंद याचें साह्य घेऊन केवळ त्याजवरच अवलंबून राहिल्याशिवाय गत्यंतर नाहीं.' तेव्हां त्याचे मसलतीप्रमाणें अमरचंदाला बोलावणें पाठवून राण्यानें त्यास आपले वाड्यांत आणिलें; व त्याला झालेली सर्व हकीकत कळवून सांगितलें कीं, 'ह्या वेळीं तुह्मींच कांहीं तरी योजना केली तर निभाव लागणार आहे.' अमरचंद हा पहिल्यापासून अगदीं सडेतोड आणि निर्लोभी असे. तो ह्मणाला, 'बरें आहे. अशी गोष्ट असेल तर त्याबद्दलचा बंदोबस्त मी करतों. परंतु हें काम ह्मणजे एकमेकांचा मत्सर करण्यासारखें नाहीं आहे; निदान, माझ्याशीं तरी कोणी मत्सर करतां उपयोगी नाहीं. कारण, ह्याविषयींचा मला पूर्वी एकदां अनुभव आलेला आहे. माझ्याकडे पूर्वी जो अधिकार होता त्याविषयीं महाराजांचे मनांत कोणी लुच्चे मनुष्यांनीं भलभलते ग्रह भरवून दिल्यावरून, मला माझ्या त्या अधिकारापासून दूर करण्यांत आलें. त्या संबंधानें मला जो अपमान वाटून लोकांमध्यें जें माझेविषयीं भ्रष्टमत प्रसृत झालें त्याबद्दल मला किती वाईट वाटत असेल ह्याचा विचार करा. तेव्हां, असा कांहीं प्रकार होऊन माझी मानखंडना कर्तव्य असेल तर मी हें जबाबदारीचें काम मुळींच पतकरीत नाहीं; ह्या कामास मग तुह्माला तशा प्रकारचीं थापडवाईक मनुष्यें दुसरीं मिळतील.' अमरचंद आणखी ह्मणाला, 'आपल्याला माहीत आहेच कीं, एकदां माझेकडे कोणतेंही काम सोंपविलें ह्मणजे मग मी त्यावर कोणाचें कांहीं एक ऐकत नाहीं, असा माझा स्वभावगुणच आहे. मग माझा मी एकटा. मला जें योग्य वाटेल तें मी करणार. मी कोणाची मसलत ऐकणारा नव्हें. मला कोणी मंत्री लागत नाहींत. माझे हुकमावर उलट हुकूम कोणाचाही चालतां उपयोगी नाहीं. ही तुमची वेळ ह्मणजे कशी आणीबाणीची आहे ती लक्षांत आणा. खर्चाच्या ओझ्याखालीं सर्व राष्ट्र दबलें गेलें आहे; सैन्यांतले लोक खवळले आहेत; आणि जवळ संग्रह तर मुळींच कशाचाही नाहीं. अशा वेळीं सर्व राज्याची व्यवस्था मजकडे आपण देतां. तेव्हां, ह्या प्रसंगास उचित असें वर्तन मला ठेवलें पाहिजे. आणि ही सर्व जबाबदारी मीं आपल्या डोक्यावर घ्यावी अशीच आपली पूर्ण इच्छा असली, तर आपण अशी शपथ घेतली पाहिजे कीं, माझे हुकमावर कोणत्याही प्रकारचा वेगळा हुकूम—मग तो कोणत्याही अर्थाचा आणि महत्वाचा असो—फिरविण्यांत न आला-पाहिजे. मला वाटेल तें मी करीन. त्यावर आपली कोणाची कुरकुर चालतां उपयोगी नाहीं. पण, आपण हेंही लक्षांत ठेवा कीं, मी

नांवाचा अमरचंद आहें. मी जें करीन तें सर्वदा सदसद्विचारपूर्वक आणि न्यायाला अनुसरूनच करीन; तथापि, आपण मला माझे कामांत यश देणार नाहीं हेंही मी समजून आहें. आणि, माझें हेंच भाकीत आपल्याही लक्ष्यांत असूं द्या.' यावर राण्यानें आपल्या कुलस्वामीची ह्मणजे एकलिंगाची शपथ घेऊन, अमरचंद यास असें खात्रीपूर्वक वचन दिलें कीं, 'तुमच्या ह्मणण्याप्रमाणें माझी सर्व कबूली आहे. इतकेंच नव्हे. तर, तुह्माला योग्य वाटल्यास तुह्मीं माझ्या राणीचे महालांत जाऊन तिच्या नाकांतली नथ जरी आपल्या राज्याचे व्यवस्थेकरितां पाहिजे ह्मणून मागितली, तरी त्याप्रमाणें ती मिळण्यास तुह्माला कोणत्याही प्रकारची हरकत होणार नाहीं.' पुढें अमरचंदास समजलें कीं, राण्याचा धाभाई हा राण्यास अशी मसलत देत होता कीं, आपण वाड्यांतून पळून जाऊन मंडलगडास राहूं. व ही आपली मसलत कशी काय होती ह्मणून त्या धाभाईनेंही पुनः अमरचंदास विचारलें. त्यावरून अमरचंदास मोठा राग येऊन तो ह्मणाला, 'तुमची ही मसलत तुमच्या स्वतःच्या स्थितीप्रमाणेंच होती. तुमच्यामध्यें जशी करारी नसून भित्रेपणा भरला आहे त्याच प्रकारची तुह्मीं आपल्या राण्यास मसलत दिली. त्यांत तुमचा दोष नाहीं. तुह्मी जर आपल्या राजाला घेऊन उदेपुरांतून मंडलगडास पळून गेलां असतां तर तेथें तुमचें रक्षण होण्याला काय साधन होतें ? व तेथें असें कोणतें गुप्त सांठवण होतें कीं त्याच्या योगानें तुमचा जन्मपर्यंत निर्वाह झाला असता ? असें एखादें कांहीं साधन मंडलगडावर आहे काय ? मंडलगडावर गेल्यानंतर तुह्मी जन्मापासून करीत आलेला गौळ्याचा आणि गुरें राखण्याचा उद्योग मात्र तुमच्या निर्वाहास उपयोगीं पडता. ह्मशी गाई बाळगाव्या, त्यांचें दूध काढून विकावें आणि त्यावर पोट भरून रहावें, हा जो तुमचा बालाभ्यास त्याला अनुसरूनच तुह्मीं राण्याला मसलत दिली. तुह्माला गुरें राखण्यापलीकडे ह्या अशा राज्यकारभाराच्या गोष्टींमध्यें अक्कलहुशारी चालवून कामें करण्यास यावीं कशीं ? तो तुमचा धंदाच नव्हे, आणि तें तुमचे योग्य कामही नव्हे. परंतु तो तुमचा उद्योग तुमच्या राणेसाहेबांस नवीनच असल्यामुळें तो त्यांस अजून शिकावयाचा आहे !' अमरचंद असें इतकें टाकून आणि निषेधपूर्वक बोलला तरी तें राणा उरसी याणें आणि त्याचे सरदारांनीं खालीं माना घालून निमूटपणें ऐकून घेतलें.

येणेंप्रमाणें राण्याचे महालांत अमरचंदाचें भाषण आणि त्याशीं राण्याचे करारमदार व आणाशपथा झाल्यावर, अमरचंद महालांतून उठून खालच्या मजल्याच्या गच्चीवर आला. तेथें, पूर्वी सांगितलेले खवळलेले सिंधी लोक जमावानें बसले होते; त्यांना तो ह्मणाला; 'चला, या माझ्या मागें. तुमच्या बाक्या वगैरे काय राहिल्या अ-

सतील त्या मी देऊन टाकतों. व पुढेंही तुमचा मुशाहिरा थकल्यास त्याजबद्दल मजवर जबाबदारी आहे.' ते रानटी व मूर्ख सिंधी लोक अमरचंदाचे या बोलण्यावर एक अक्षरही न बोलतां, ते उठून त्याचे मागें चालले. ज्यांनीं रागानें व बेमुर्वतीनें आपल्या राण्याचा पदर धरून त्याचा अपमान केला होता ते, ह्याप्रमाणें, शांतीनें अमरचंदाचे मागोमाग चालते झाले. नंतर अमरचंद यानें त्या सर्व लोकांचे हिशेब बघून त्यांना किती पैसे द्यावे लागतील याचा अजमास काढला; व 'उद्यां येऊन तुह्मी आपल्या बाक्या घेऊन जा,' असें सांगून त्यांस वाटेस लाविलें. तेव्हां ते लोकही अमरचंदाच्या शब्दावर विश्वसून कांहींएक गडबड न करितां चालते झाले. मग अमरचंदानें राण्याच्या भांडारगृहाच्या किल्लया मागून घेऊन, सर्व भांडारखाने फोडले. त्यानें जेव्हां भांडारखान्याच्या किल्लया मागितल्या तेव्हां ते सर्व किल्लेदार पळून गेले; परंतु अमरचंदाचा हुकूम कोणीही अमान्य करतां कामा नव्हतें. त्यामुळें, त्याचे हातीं सर्व किल्लया आल्या व नंतर एकंदर भांडारामध्यें जेवढें ह्मणून सोनें आणि रुपे होतें तेवढें त्याणें बाहेर काढलें. त्याणें मग भांडारगृहांत सोन्याचा किंवा रुप्याचा एकही दागिना किंवा लगड ह्मणून शिलक ठेविली नाहीं. आणि, येणेंप्रमाणें, सर्व सोनें व रुपें बाहेर काढून त्याणें त्यांचीं नाणीं पाडण्याचा हुकूम केला. त्याचप्रमाणें, राण्याचे भांडारांत जेवढें जवाहिर होतें तेवढें सर्व गहाण टाकून सावकारांकडून कर्जाऊ पैसे आणिले; आणि दुसरे दिवशीं कबूलीप्रमाणें राजवाड्यामध्यें त्याणें द्रव्याचा ढीग घातला. नंतर सर्व लोक आल्यावर त्यांच्या बाक्या व मुशाहिरे त्यांचे पदरांत टाकून त्यांस खुष केलें. अमरचंद एवढेंच करून स्वस्थ राहिला नाहीं. त्याणें ताबडतोब सामानासुमानाची भरती करून, एकंदर सैन्यामध्यें चांगला पुरवठा केला; आणि आपल्या सर्व लोकांस जणूं काय नवा दम आणून, त्यांना आतां शत्रूंशी लढणें ह्मणजे साहजिक आणि क्षुल्लक काम आहे असें वाटण्यास लावलें. शत्रूंचा वेढा जो उदेपुरास पडला होता तो सहा महिनेपर्यंत तसाच होता; तरी त्यांस ह्मणून आंतल्या लोकांनीं दाद दिली नाहीं.

इकडे तोतयाच्या पक्षाचा धाक आणि वजन चोहोंकडे दिवसेंदिवस वाढतच चाललें होतें. उदेपूरच्या वाऱ्यांपर्यंत तोतयाचें प्राबल्य लोकांमध्यें महशूर होऊन, आतां पुढें तोतया राणाच खरा राणा ह्मणून उदेपूरच्या गादीवर येतो, असा सर्व लोकांचा पुरा ग्रह होत चालला. इतकें जें त्याचें वजन व लौकिक वाढला त्याला कारण, अर्थात् त्याचे साह्यकर्ते जे मराठे, ते होते. आणि, त्यांच्या सरदाराशीं (शिंद्याशीं) तोतयानें करारही तसाच केला होता, व त्या आशेवरच शिंदा नेट देऊन तोतयाचा पाठीराखा झाला होता. परंतु, पुढें पाहतो तों तोतयाकडून कराराप्रमाणें त्याला

कांहींच पोंचेना; आणि, शिंद्याला नांवापेक्षां पैशाचा लोभ फार असल्यामुळें, त्याणें तोतयाचा पक्ष सोडून अमरचंदाशीं बोलणें लाविलें कीं, 'तुह्मी जर मला ७० लाख रुपये देत असाल तर मी तोतयाचा पक्ष सोडून उदेपूरचा वेढा उठवतो.' शिंद्याचें हें बोलणें अमरचंदानें कबूल करून त्याप्रमाणें तहनामा लिहिला व त्याजवर त्याणें राण्याचे वतीनें सहीही केली. परंतु शिंद्यास द्रव्याशा अतिशय असल्यामुळें त्याला असें वाटलें कीं, उदेपूरशहर काबीज करून लुटलें असतां फार द्रव्य मिळेल. आणि तसा विचार करून, त्याणें तसाच नेट देऊन उदेपूरशहर काबीज करण्याची व्यवस्था चालविली; व तो वेळेवर करारापेक्षां २० लाख रुपये जास्त मागूं लागला. असा त्याचा अप्रामाणिकपणा पाहून अमरचंदास मोठा राग आला; व त्यानें सही केलेला तहनामा फाडून त्याचे तुकडे तुकडे केले; आणि ते तुकडे त्याजकडे पाठवून त्याच्या अधमपणाबद्दल त्याला लाज वाटेल असा त्यास निरोप धाडिला. आपण अशा योग्य आणि सामदामाच्या व्यवस्था लावीत असतां, नीच मनुष्यांशीं प्रसंग पडल्यामुळें त्यांत आपणास यश न मिळून जास्त जास्त संकटें येतात असें पाहून अमरचंदाचा आवेश अतिशयच वाढला; व त्यानें असा निश्चय केला कीं, आतां काय होईल तें होवो, शत्रूंशीं लढाई केल्याशिवाय रहावयाचें नाहीं. त्यानें सिंधी आणि इतर सर्व सैनिक लोक यांस आपल्यापुढें बोलावून आणून त्यांस सांगितलें कीं, 'हा प्रसंग मोठा बाणीचा आहे. तुह्मीं आपल्या इमानास जागून आणि आपलें ब्रीद राखण्याचा निश्चय करून लढलें पाहिजे.' याचप्रमाणें, त्यानें रजपूत सरदारांसही मोठ्या आवेशपूर्वक कळविलें कीं, 'ह्या वेळीं भित्रेपणा दाखवून कांहीं उपयोग नाहीं.' अमरचंदाचें हें भाषण ऐकून सर्वांना तें त्याचें ह्मणणें अगदीं बाणून जाऊन मोठा आवेश आला. अमरचंद यानें सर्व लोकांस नुस्त्या भाषणानेंच आवेश आणिला नाहीं; तर सैन्यांतील शूर लोकांस आणि सरदारांस उत्तेजन येण्यासाठीं मोठमोठीं बक्षिसें देण्याकडे, मोठमोठे किंमतवान् अलंकार जे राण्याच्या खजिन्यांत नुस्ते पडून राहिले होते ते खर्चीं घालून सर्वांना खुष केलें; आणि त्यांस आपल्या शहराचे रक्षणाविषयीं विशेष प्रोत्साहन दिलें. त्याचप्रमाणें, त्यानें शहरांत व शहराबाहेरून, जेथून मिळवतां आला तेथून मिळवून दाण्यागोट्याची

---

१. हा दाणागोटा जमविण्यांत अमरचंदानें आपपरपणा सर्व एकीकडे ठेवून, जेथून मिळाला तेथून तो निरखाप्रमाणें मिळवून आणण्यास त्यानें कमी केलें नाहीं. ह्यामध्यें त्यानें आपल्या स्वतःच्या आप्तस्वकीयांचे मायापाशही सर्व एकीकडे ठेवून, ज्या कोणाचे घरीं धान्याचे संग्रह असल्याची त्यास बातमी लागली तेथून त्यानें त्यांस धान्याच्या किमतीचे पैसे देऊन, शिपाईलोकांस पुरवठा करण्यासाठीं तें बाजारांत पाठवून दिलें. ह्या प्रसंगीं त्यानें आपला निष्पक्षपातीपणा विलक्षण रीतीनें दाखविला. त्याच्या एका मेहुण्याचे घरीं असाच धान्यसंग्रह होता; तो ठरावाप्रमाणें

यथेच्छ भरती करून, एके दिवशीं सर्व शहरांत अशी दवंडी पिटली कीं, 'सैन्यांतल्या प्रत्येक असामीनें आपल्या घरीं सहा महिने पुरेल इतका धान्यांचा संग्रह करून ठेवावा.' अमरचंद मोठा धोरणी आणि प्रसंगावधानी असे. ह्या वेळीं मेवाडांत दुष्काळ पडला असून, रुपयाची शेरभर धारण झाली होती. असें असतां, अमरचंदानें ह्याप्रमाणें जेव्हां बाजारांत धान्यांचे ढीग घालून, सैन्यांतले एकंदर लोकांस दांडोरा पिटून सहा सहा महिन्यांपुरता धान्यसंग्रह करून ठेवण्यास कळविलें, तेव्हां सर्व लोकांनाही मोठें आश्चर्यच वाटून, जिकडे तिकडे त्याचेविपयीं धन्यवाद निघूं लागला! विशेषेंकरून, शिंद्याचे लोकांस फारच चमत्कार वाटून, शहरांतल्या लोकांचा आवेश आणि तयारी बघून त्यांचा धीर सुटत चालला. सिंधी लोकांस तर असमाधानी किंवा नाखुष राहण्यास मुळींच कांहीं कारण उरलें नव्हतें. त्यांनीं शूर अमरचंदाचा आवेश आणि त्यानें दिलेलें उत्तेजन बघून, तो सांगेल त्याप्रमाणें वागण्याचा निश्चय केला. ते सर्व लोक एका ठिकाणीं मिळून राजवाड्यांत गेले; आणि, त्यांनीं, 'राण्याचा पक्ष न सोडतां मारूं किंवा मरूं' अशी शपथ घेऊन प्रतिज्ञा केली. त्यांचा मुख्य आणि पुढारी अदिलबेग ह्मणून होता. तो सर्वांच्या वतीनें राणा आणि अमरचंद यांचे पुढें होऊन ह्याप्रमाणें बोलला, 'आह्मी आपलें निमक (मीठ) ज्या अर्थीं बहुत दिवस खाल्लें आहे, आणि त्याचप्रमाणें, आपल्याकडून आजपर्यंत अनेक रूपांनीं बक्षिसें व इनामें वगैरे मिळवून आह्मी सुखी झालों आहोंत, त्या अर्थीं, आह्मीं, आपला प्रामाणिकपणा रक्षण करून आमचें इमान आपल्यास समजाविण्यासाठीं आपले कदमाशीं आलों आहोंत. आह्मी अशी शपथ घेतों कीं, आह्मी आपल्याला कधींच सोडून दूर होणार नाहीं. उदेपूर ही आमची मातृभूमि आहे; आणि, ह्या मातृभूमीसाठीं आपले प्राण देऊं. ह्यापुढें आह्मी आपल्याकडे पगार ह्मणून मागणार नाहीं. आपण आह्मांस सहा सहा महिन्यांचे शिधे दिले आहेत. ते संपले तरी आह्मी आपल्या गुरांढोरांवर आपला निर्वाह करूं. आणि, गुरें ढोरेंही संपलीं तरी आह्मी दक्षिणी लोकांवर तुटून पडून त्यांस मारून जय मिळवूं; किंवा त्यांच्या हातून आह्मी धारातीर्थीं पडून, आपल्यावरील आमच्या पोषणाचा भार कमी करूं.' ह्या प्रकारचा अभिमान आपल्या लष्करांत अमरचंदानें आपल्या विलक्षण उदारपणानें आणि प्रासंगिक योजनेनें सर्व उदेपुरशहरांत उत्पन्न करून ठेविला होता. ज्या सिंधी लोकांनीं थोडे दिवसांपूर्वीं

---

त्याचे घरून मोजून आणिते वेळीं, त्यानें अमरचंदास, आपलें आप्तत्व जाणून तरी हे सांठविलेलें धान्य बाजारांत नेऊं नये, अशा प्रकारचा कांहीं मायापाश घातला. तेव्हां अमरचंदानें त्यास सांगितलें कीं, 'माझा निष्पक्षपात दाखविण्यास तुह्मी मला मदत करा!' अमरचंद बोलण्यांत मोठा गोड असून, मोठ्या युक्तीनें आपला हेतु सिद्धीस नेण्याविषयीं त्याचा हातखंडा असे.

राण्याचा पदर धरून बेमुर्वतीनें आणि निमकहरामपणानें त्याची इज्जत घेण्याचा व दांडगेपणा करण्याचा विचार केला होता, तेच सोरट लोक ह्याप्रमाणें लोण्यापेक्षांही मऊ होऊन, विलक्षण रीतीचे स्वामीभक्त बनले; आणि त्या कडक स्वामीभक्तीचे हृदयद्रावक अभिमानोद्गारही जे त्यांनीं काढिले, त्या एकंदर अपूर्व देखाव्यावरून राणा उरसी यास तर अमरचंदाचे व्यवस्थेविषयीं धन्य धन्य झाली! इतकेंच नव्हे; तर, वर सांगितलेलें अदिलबेग यानें जें मोठ्या नम्रपणें राण्याचे पुढें होऊन स्वामीभक्तिदर्शक आणि अभिमानपुरःसर भाषण केलें, तें ऐकून, राणा उरसी हा इतका निष्ठुर होता तथापि, त्याचे डोळ्यांतून केवळ टिपेंच आलीं, असें सांगतात! अशा प्रकारचा उदेपुरामध्यें जिकडे तिकडे अभिमान पसरून सर्व लोकांना मोठा आवेश चढला. ही गोष्ट शिंद्याला कळली, व त्याची फौज जी पुढें येण्याचे विचारांत होती तिचे वर सिंधी व रजपूत यांच्या बंदुका सुरू झाल्या. मराठे लोक जरी त्या वेळीं मोठे शूर आणि लढवय्ये ह्मणून प्रसिद्ध होते तरी, त्यांस, रजपूत लोक निराश होऊन आवेशाला चढले ह्मणजे फार भयंकर असतात, हें माहित होतें. तेव्हां, त्यांच्या आवेशाला पुढें कांहीं भयंकर कृत्य करण्यास अवकाशच न दिल्यास आपला निभाव लागणार आहे, असें शिंद्यानें मनांत आणून, पुनः अमरचंदाशीं तहाचें बोलणें लाविलें. ही वेळ ह्मणजे, अमरचंदाच्याच सरशीची होती. शिंद्याचें बोलणें ऐकून, अमरचंदानें, त्याच्या अप्रामाणिकपणाचें प्रायश्चित्त त्याला कांहीं तरी लागलें पाहिजे ह्मणून, त्यास कळविलें कीं, 'तुह्मी गेले सहा महिने उदेपुरशहराला वेढा घालून बसल्यामुळें आह्मास अतिशय नुकसान सोसावें लागलें. ती नुकसानी जर तुह्मी पूर्वी ठरलेल्या तुमच्या रकमेंत वजा करून बाकीची रक्कम स्वीकारीत असाल, तर आह्मी तुमचें तहाचें बोलणें मान्य करूं!' त्याप्रमाणें शिंद्यानें अमरचंदाचें ह्मणणें कबूल करून, पूर्वी जे ७० लाख रुपये शिंद्याला देण्याचा विचार होता त्यांत त्यांत १० लाख रुपये नुकसानीबद्दलचे वजा करून, बाकी ६० लाख रुपये आणि ३॥ लाख रुपये मुत्सद्दीखर्च[1] असे ६३॥ लाख रुपये घेण्याचें व देण्याचें कबूल होऊन, तहनाम्यावर शिंद्याची आणि अमरचंदाची सही झाली.

वर सांगितलेल्या ६३॥ लाख रुपयांपैकीं ३३ लाख रुपयांचें जवाहीर, मोतीं, आणि सोन्यारुप्यांचीं भांडीं वगैरे अमरचंदानें शिंद्याचे पदरांत टाकिलीं. त्याचप्र-

१. 'मुत्सद्दीखर्च' ह्मणून एक मराठ्यांच्या जमाखर्चांत सदर असे. जेव्हां कधीं खंडणी घेऊन तह करण्याचा विचार असे तेव्हां त्या खंडणीशिवाय मराठ्यांचे जे मुख्य सरकारी अधिकारी ह्मणजे मुत्सद्दी असत त्यांच्या नांवाचा एक स्वतंत्रच खर्च आकारून तो त्या खंडणीवर 'मुत्सद्दीखर्च' ह्मणून चढवीत. आणि त्यासुद्धां खंडणीची रक्कम सांगण्यांत येई. ह्याप्रमाणें खंडणी आकारण्यास मराठ्यांना त्यांच्या सरकारची परवानगीच असे.

माणें, त्या ३३ लाखांची भरती करण्यासाठीं अमरचंदाला उदेपूरदरबारच्या ठाकुर सरदारांवरही कांहीं हिस्सेरशीनें पैसे आकारून, त्यांजकडून वसूल घेऊन तो त्या रकमेंत घालावा लागला. आणि, बाकी राहिलेल्या रकमेबद्दल कांहीं गांव मराठ्यांकडे गहाण लावून दिले. ह्या गहाण लावून दिलेल्या गांवांत जावद, जीरण, नीमच, आणि मोरवण हीं चार गांवें मेलीं असून, त्यांजवर मराठ्यांचे व उदेपूरदरबारचे असे दोन्ही बाजूंचे मामलेदार नेमिले जाऊन, त्या दोघांनीं मिळून वसूल करण्याचें ठरलें होतें. ह्याप्रमाणें, वि० सं० १८२५ (इ० स० १७६९) पासून वि० सं० १८३१ (इ० स० १७७५) पर्यंत, ह्मणजे, पांच वर्षेपर्यंत, ठरलेली वहिवाट चालू होती. परंतु शेवटच्या वर्षी त्या सुरळीत चाललेल्या वहिवाटीस शिंद्यानें खो घातलाच. गहाण लावून दिलेल्या गांवांवर उदेपूरदरबारच्या वतीनें मामलेदार होते त्यांस शिंद्यानें हुसकून लाविलें. कारण ते सर्व गांव जे मराठ्यांकडे गहाण होते, तें गहाण डुबविण्याचा त्याचा निश्चय झाला. आणि, त्याप्रमाणें, ते सर्व गांव मेवाडच्या अमलांतून सुटून शिंद्याचे अमलांत गेले. ते शिंद्याकडे वि० सं० १८५१ (इ० स० १७९५) पर्यंत होते. इ० स० १७७५मध्यें अशी गोष्ट झाली कीं, दक्षिणेकडे पेशव्यांचें जें अधिकारजाल दिवसेंदिवस पसरत चाललें होतें तें तोडून, त्यापासून मराठे सरदारांपैकीं जो तो स्वतंत्र होण्याची संधि बघत होता. त्या संधींतच असें झालें कीं, ज्याणें जो मुलूख काबीज केला तोच त्या मुलखावर मालक होऊन बसला. तेव्हां शिंद्यानेंही अपहारबुद्धीनें आणि स्वार्थावर नजर देऊन, जिकडून होईल तिकडून दाबादाबी चालविली; आणि, वर लिहिल्याप्रमाणें, राण्याकडच्या पांचही गांवांचा अपहार करून तो ढेंकर देऊन बसला. राण्याची फार हीन दशा झाली होती. इतक्यांत होळकरानेंही राण्यास धाकदडप दाखवून कांहीं मुलूख उपटण्याचें संधान लाविलें; व तसा कांहीं मुलूख न मिळाल्यास शिंद्याप्रमाणेंच उदेपुरावर स्वारी करण्याची त्याणें भीति घातली. त्या वेळीं मात्र शिंद्याकडून मोरवण महाल आणि आपल्याकडील निंबहैरा महाल असे दोन महाल राण्यानें होळकराला दिले, आणि त्याला थोपवून ठेविलें. येणेंप्रमाणें, राण्याकडचे एकंदर पांच महाल शिंदा आणि होळकर यांणीं सहज उपटले; आणि राण्याला तर त्या संबंधानें जास्त हट्ट धरून भांडत बसण्यामध्यें यशोलाभाची बिलकुल आशा नसल्यामुळें, होत असलेला जुलमाचा व अपमानाचा प्रकार स्वस्थपणें बसून पाहण्यावांचून गत्यंतरच नव्हतें! कालगति आणि ग्रहदशा विपरीत झाल्या ह्मणजे कोणाची काय दशा होईल हें सांगवत नाहीं!

वर सांगितल्याप्रमाणें, वि० सं० १८२६ (इ० स० १७७०)मध्यें, राण्यानें आ-

पल्या राज्यांतील फार सुंदर आणि पिकाऊ असे चार महाल गमावून उदेपूरचा वेढा उठविला. आतां, त्याणें जे चार सुंदर महाल शिंद्याला दिले, ते ह्मणजे अगदीं फरोक्त करून दिले होते असें नसून, ते त्याला गहाण ह्मणून लावून दिले होते. परंतु पुढें शिंद्यानें त्या महालांचा अपहार केला, व ते महाल राण्यापासून गमावले. शिंद्यानें आपल्याशीं प्रामाणिकपणानें वागावें, व आपण त्याला मन:पूर्वक मानतों असें दाखविण्याकरितां, शिंद्याची बायको गंगाबाई ह्मणून होती ती त्याचे हद्दींतील मालोणी नांवाच्या गांवांत वारली तेव्हां, तिचे स्मारकासाठीं, राण्यानें तो सबंध गांवच लावून देऊन, शिंद्यावरील आपला लोभ, प्रेम व पूज्यभाव हीं अधिक स्पष्ट केलीं. परंतु त्याचा शिंद्याला कितीसा उपकार वाटला हें त्याच्या पुढील कृत्यांवरून कळण्यासारखें आहेच. दिवसेंदिवस मेवाडचा लौकिक आणि त्याची वजनदारी घटत चालली. गहाण ह्मणून ठेवलेले गांव शिंद्यानें दाबून टाकिले, ते, गहाणाची रक्कम त्यास भरली तर रीतीप्रमाणें परत मिळण्यास तरी बिलकुल हरकत नसावयास पाहिजे होती; परंतु त्याप्रमाणेंही शिंदा राहिलेली रक्कम घेऊन, हातीं आलेले आणि दाबून टाकलेले गांव देईल अशी आशा नव्हतीच. आणि दुसरें, राण्याजवळही तितकी रक्कम भरपाई करण्यास पैसा कोठें होता? सारांश, गेलेले मुलूख परत मिळण्याला मार्ग नव्हता; आणि मार्ग असता तरी ते परत मिळण्याची फारच थोडी आशा होती. पुढें, इ० स० १८१७ मध्यें, मेवाडच्या राण्याचा आणि इंग्रजसरकारचा तह झाला, व त्या तहामध्यें शिंद्यानें बळकावलेले महाल इंग्रजसरकारानें मध्यस्थी करून परत द्यावे असें ठरलें होतें. परंतु तसें इंग्रजसरकाराकडूनही झालें नाहीं. याचें कारण, एक तर त्या वेळीं इंग्रजसरकारास हल्लींप्रमाणें सर्व देशाची पूर्णपणें माहिती झाली नव्हती. तेव्हां, जे महाल परत मिळवून द्यावयाचे ह्मणून तहांत ठरलें होतें ते महाल परत मिळवून देण्यास काय काय संकटें व हरकती येतील याचें त्यांस अगोदर नीटसें अनुमान झालें नाहीं; आणि दुसरें, जसा मेवाडच्या राण्याशीं इंग्रजांचा तह झाला होता तसाच शिंद्याशींही त्याचा तह झाल्यामुळें, त्यांस शिंद्याला जें अनिष्ट तें करून, त्याच्या ताब्यांतले महाल परत उदेपुरच्या राण्यास द्यावेसे न वाटणेंही साहजिक होतें. तरी, ह्यामध्यें शिंद्याची परंपरेची अपहारबुद्धि कायम होती, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. पूर्वी, विश्वासघातानें आणि अपहार करून जे महाल राण्यापासून घेतले गेले, तेच आतां, परस्पर स्नेहसंबंध झालेला स्मरून, शिंद्यानेंच आपण होऊन ते महाल राण्याचे राण्यास सत्कारपूर्वक देऊन, आपल्या मनाचें थोरपण दाखविण्याला तो उत्तम

---

१. हा गांव ज्या बाईच्या स्मारकार्थ राणा उरसी याणें दिला, त्या गांवाला हल्लीं 'गंगापुर' असें ह्मणतात.

संधि होता. परंतु त्याप्रमाणें शिंद्याकडून गोष्ट घडली नाहीं. राजकारस्थानांत अशीं उदाहरणें पावलोंपावलीं शतशः आढळतात. राज्योपभोग भोगावयाचे, आणि त्यांत निर्लोभता दाखवयाची, ह्या गोष्टी परस्पर अगदीं विरुद्ध आहेत; असें एकंदर इतिहासावरून सहज कळण्यासारखें आहे. तेव्हां ह्या कामांत एकट्या शिंद्याकडेच तरी दोष काय ह्मणून द्यावा ?

असो; अमरचंदानें उदेपूरशहराचे रक्षणाविषयीं जो बंदोबस्त केला आणि त्याचेकडे मराठे जसे फितुर होऊन तोतयाचा पक्ष सोडून गेले, तसा तोतयाचा एकंदर बेत सफाई ढांसळून, येथपर्यंत मिळविलेलें सर्व यश निरर्थक जाण्याचा प्रसंग आला. तोतयानें आपला पक्ष दृढ असल्यामुळें आजपर्यंत बरेच किल्ले वगैरे काबीज केले असून, रेंटीत रेंटीत तो उदेपूरच्या अगदीं पायथ्याशीं येऊन पोंचला होता. परंतु तें सर्व यशाचें गाडें फिरून त्याचा पक्ष दुर्बल होत चालला. अमरचंदानें तोतयाचे ताब्यांतून राजनगर, रायपुर, आणि अंताळा हे किल्ले परत घेऊन, त्याला मागें हटविलें. त्याचप्रमाणें, पुष्कळ सरदार लोक अमरचंदास जाऊन मिळाले. तेव्हां तोतयाला परत कुमळमेरास जाऊन आपल्या डेप्रा प्रधानासहवर्तमान स्वस्थ रहावें लागलें. यावेळीं त्याचेकडेस फक्त देवगड, भैंदर, आणि अमाइत[१] ह्या तीन ठिकाणचे ठाकूर काय ते त्याचा पक्ष धरून राहिले. बाकी सर्व सरदार अमरचंदाकडे जाऊन मिळाले. ह्याप्रमाणें, हें तोतयाचें बंड वि० सं० १८३१ पर्यंत चाललें होतें. पुढें वरील तिघे सरदारही राण्याकडे जाऊन मिळाले; आणि तोतयाचा पक्ष अगदींच दुर्बल झाला. गोदवाडप्रांत राण्यानें मारवाडचा राजा विजयसिंग यास दिला होता. गोदवाडप्रांत फार चांगला आणि सुपीक असून, त्या प्रांतांत राणावत, राठोड आणि सोळंखी हे सरदार मोठे राजनिष्ठ असे रहात असत. गोदवाडप्रांत, जोधपुर (मारवाडची राजधानी) बांधण्यापूर्वींच मंदोडच्या परिहार राजा याजपासून घेतला होता. तोतया राण्याचा जसजसा जास्त जास्त जय होत चालला तसतशी त्याची उदेपुरावर स्वारी येण्याची जास्त जास्त भीति राणा उरसी यास सहज वाटूं लागली. तेव्हां, त्याला मध्यें हरकती व्हाव्या आणि उदेपुराकडे त्याचें येणें संकटानें व्हावें, ह्मणून, मध्यें राण्यानें गोदवाडप्रांत मारवाडच्या राजाकडे देऊन तेथें त्याजकडून तोतयाला हरकत होण्याची योजना केली. कारण, तोतयाची राजधानी कुमळमेर ही गोदवाडप्रांताच्या जवळच होती. तेव्हां, त्याचे जवळच त्याला धाक दाखविणारा हा मारवाडचा शत्रु राण्यानें उत्पन्न करून ठेविला. तसेंच, गोदवाडप्रांत मारवाडाकडे

---

१. अमाइत येथील ठाकूर पहिल्यानें तोतयाचे पक्षास मुळींच मिळाला नव्हता, (पृष्ठ ३२४ पहा.) परंतु पुढें तो तोतयाला मिळाला, असें दिसतें.

दिला तरी, त्याबद्दल तेथील राजाकडून ३००० स्वारांचा पुरवठा झाला पाहिजे, असा राण्यानें करार लिहून घेतला होता. तेणेंकरून राण्याला दोनही बाजूंनीं फायद्याचेंच कलम होतें. गोदवाडप्रांत मारवाडचे मालकीचा झाल्यामुळें, कुमळमेराला ह्मणजे तोतयाला एके प्रकारें त्याचा धाकच झाला; आणि शिवाय, राण्याला मदतीसाठीं विनखर्चानें ३००० स्वार मिळाले. पुढें तोतयाचा पक्ष दुर्बल झाल्यावरही गोदवाडप्रांत मारवाडाकडेच ठेवण्याचें कारण नव्हतें. तो प्रांत राण्याला आपला आपल्याकडे परतही घेतां आला असता; परंतु, तोतयाची गडबड बहुशः मोडून सर्वत्र निश्चित झालें असतांही राण्यानें आपलें लक्ष शिकारी व पारधीकडेच विशेषेंकरून दिलें. त्यामुळें आपल्या मुलखाची नीट रीतीनें व्यवस्था करण्याकडे त्याचें दुर्लक्ष झालें. तो हाडा राजपुत्राबरोबर बुंदीकोट्याकडे वसंतकाळांतल्या मजेच्या शिकारी करण्यामध्येंच गुंतला. ह्या शिकारीच्या नादानें राण्याचा परिणाम चांगला होणार नाहीं, असें एका सतीनें आपल्या चितेंतून राण्याला भाकीत सांगितलें होतें, असें ह्मणतात. परंतु, त्या भविष्याला राणा उरसीनें मुळींच जुमानलें नाहीं. असें ह्मणतात कीं, ज्या सतीनें वरील भविष्य सांगितलें होतें ती राण्यास ह्मणाली कीं, 'मेवाडच्या राण्यांस शिकारीपासून कधींही यश मिळावयाचें नाहीं. कारण, पूर्वी तीन राणे शिकारीला गेले असतांच त्यांचा नाश झाला; तसाच आतां तूंही शिकारीस जाशील तर त्यामध्यें तुझाही नाश होईल.' परंतु, राण्यानें तें मुळींच न मानतां, तो बुंदीप्रांतांत शिकारीला गेला असतां, तेथें बुंदीच्या राजपुत्रानें त्याचे पोटांत भाला मारून त्याचा जीव घेतला. ह्याप्रमाणें त्या राजपुत्राला राणा उरसीचा जीव घेण्याचें कारण असें झालें कीं, पूर्वी, उज्जनीस राण्याचे पक्षानें जो साळुंब्याचा ठाकूर लढून मेला त्याचे मुलाच्या संबंधानें राण्याला कांहीं फितुरीचा वगैरे संशय येऊन, एके दिवशीं, तो ठाकूरपुत्र राण्याचे भेटीस गेला असतां, त्याला उठते वेळीं जो राण्याकडून विडा मिळाला तो विडा खाण्याविषयीं राणा उरसीनें त्याला फारच आग्रह केला. राण्याकडून मिळालेला सन्मानाचा विडा, ज्यांना तो मिळेल त्यांणीं खाल्लाच पाहिजे असें नसून, ज्या अर्थी राणा आपल्याला आज विडा खाण्याविषयीं विशेष आग्रह करीत आहे त्या अर्थी त्यापासून आपला घात होणार आहे, असें साळुंब्याच्या ठाकूरपुत्रास तत्क्षणींच वाटलें. तेव्हां, तो राण्याला ह्मणाला कीं, 'हा विडा माझा घात करणारा आहे, असें जाणूनच तो मी आपल्या आग्रहावरून खातों; परंतु, अशा रीतीनें माझा घात करण्यापासून आपलें कल्याण होणार नाहीं!' तो आपल्या दुष्ट राण्यास आणखी ह्मणाला, 'हा विडा ह्मणजे मृत्यूच्या घरचें बोलावणें आहे; तथापि, माझ्या हत्येचें व घाताचें पातक तुह्माला व तुमच्या

कुटुंबास भोंवल्याशिवाय राहणार नाहीं !' आणि, असें ह्मणून त्यानें तो विषयुक्त विडा खाल्ला, व त्यापासून तो लागलाच मरण पावला ! तेव्हां, हें दुष्ट कृत्य बुंदीच्या राजपुत्राला सहन न होऊन, त्यानें मृताचा शाप खरा झाला असें दाखविण्यासाठीं, लागलाच, वर सांगितल्याप्रमाणें राणा उरसी याचे पोटांत भाला खुपसून त्याचा अंत केला.

ह्या घडलेल्या कृत्यांत अनेक गोष्टी समजण्यासारख्या आहेत. मेवाडच्या राण्याविषयींची राजस्थानांत असलेली पूज्यबुद्धि आणि सन्मान हीं रजपुतांचे मनांतून घालविण्यास राणा उरसीचें वरील घातुक कृत्य मुख्य कारण झालें. त्याचप्रमाणें, बुंदीच्या राजपुत्रानें साळुंब्र्याच्या ठाकुरपुत्राबद्दलचा जो तत्काल सूड उगविला त्यावरून, रजपुतांची परस्पर मित्रप्रीति आणि समयानुवर्तन हीं कशीं जागृत होतीं हेंही समजण्यासारखें आहे. राणा उरसीनें साळुंब्र्याच्या ठाकुराचा घात करून ज्या प्रकारचा भित्रेपणा आणि नीचपणा दाखविला, त्या मानानें पाहिलें असतां त्याचा बुंदीच्या राजपुत्रानें जो भाल्यानें नाश केला तो कांहीं वावगा होता असें ह्मणतां येत नाहीं. परंतु, बुंदीच्या राजपुत्रानें केवळ साळुंब्र्याच्या ठाकुरपुत्राचे अभिमानानेंच राणा उरसीचा घात केला असें नाहीं; तर, त्याचा राण्याशीं कांहीं खाजगत खुनशीपणा होता, व त्या खुनशीपणामुळेंच मुख्यत्वेंकरून त्याचेकडून राण्याचा घात झाला; असेंही कित्येकांचें ह्मणणें आहे. बुंदीच्या राजाचा आणि राण्याचा खुनशीपणा वाढण्याचें कारण असें होतें कीं, कांहीं सीमाबाद निघून त्यामध्यें बुंदीच्या राजाचे साह्यामुळें राण्याला यश मिळालें. त्या साह्याबद्दलची कृतज्ञता राण्यानें दाखवावयाची तशी न दाखवितां, बुंदीच्या राजास त्यानें थोडीशी जमीन मात्र दिली. त्या जमिनींत कांहीं आंब्यांचीं झाडें मात्र होतीं. यापेक्षां त्या जमिनीपासून दुसरें कांहीं उत्पन्न होण्यासारखें नव्हतें. राण्यानें बुंदीच्या राजाची कृतज्ञता अशा कार्पण्यानें दाखविल्यामुळें राजास आपला अपमान झालासें वाटलें; आणि त्या अपमानाचा सूड उगवावा ह्मणूनच त्याच्या मुलानें वर लिहिल्याप्रमाणें संधि राखून त्याचा घात केला. राणा उरसी व बुंदीचा राजपुत्र असे दोघेही एका रानडुकराचे मागें लागले होते. त्या संधींतच राजपुत्रानें आपला भाला राण्याचे पोटांत खुपसून त्याचीं आंतडीं बाहेर काढलीं. राजपुत्राला राण्याचे कार्पण्याबद्दलच जर एवढा अपमान झालासें वाटून राग आला होता असें मानलें, तर त्यानें केलें हें कृत्य अत्यंत नीचपणाचें व भीरुतेचें केलें. शूरत्वाचें तें काम झालें नाहीं हें खचीत. परंतु, साळुंब्र्याच्या ठाकुराचे मुलाला राण्यानें जो विषप्रयोग करून ठार मारलें, त्या त्याच्या नीच कृत्याबद्दलचें जर बुंदीच्या राजपुत्रानें राण्याला शासन

केलें असलें, तर तें कांहीं वावगें नव्हतें. परंतु, या दोन्ही गोष्टींत कोणत्या गोष्टीनें राण्याचा घात झाला ह्याबद्दल निश्चित असें कांहींच सांगतां येत नाहीं. हें कांहीं असो. बुंदीच्या राजपुत्रानें केलें हें कृत्य कोणासही पसंत पडलें नाहीं. खुद्द त्याच्या बापानें त्याच्या ह्या कृत्याबद्दल त्याचा अतिशय निषेध केला; व सर्व हाडाकुलामध्यें त्याची अगदीं बदनामी आणि दुर्लौकिक झाला. राणा उरसी याचा वध जेथें झाला तेथें एक स्मरणार्थ खांब उभा केला असून, तेथेंच त्याचे प्रेताचा दहनविधि वगैरे झाला. बुंदीच्या राजपुत्रानें जें हें राजघाताचें काम केलें तेणेंकरून त्या दोघां कुलांमध्यें जास्त जास्त वैर मात्र पेटत चाललें.

राणा उरसी यास हम्मीर आणि भीमसिंग असे दोन मुलगे होते. ह्या दोघां पुत्रांतला वडील मुलगा हम्मीर हा आपल्या बापाच्या मागून वि० सं० १८२८ ह्मणजे इ० स० १७७२ या वर्षी उदेपूरच्या गादीवर बसला. या वेळीं राणा हें पद ह्मणजे कांहीं फारसें महत्वाचें वाटत नसे. इतका त्याचा लौकिक व त्या संबंधाची लोकांमधील पूज्यता कमी कमी होत चालली होती! हम्मीर हा गादीवर बसला तेव्हां तो अज्ञान होता; ह्मणून त्याचा कारभार त्याची आईच पहात असे. या राणीच्या पक्षाचे सुक्तावत सरदार होते. परंतु, राणा उरसी यानें ज्या साळुंब्र्याच्या ठाकुराला विप्रयोगानें मारलें होतें त्याचा मुलगा त्याबद्दल सूड उगविण्याची संधि बघत होता; व कोणीकडून तरी उदेपूरच्या राण्याचे वंशजांवर आपला सूड उगविण्याची त्यानें खटपट चालविली होती. ह्याप्रमाणें, आपसांतल्या वैमनस्यानें मेवाडच्या राण्याचा चोहोंकडे जास्त जास्त दुर्लौकिक वाढत जाऊन, कारभारी राणीच्या अमलांत रणकंदनें माजलीं; आणि क्षुद्रपणाचीं पुंडावीं व लुटालूटपणा मात्र चोहोंकडे वाढत चालल्यामुळें लोकस्वास्थ्याचा अभाव झाला!

उदेपूरचे सैनिक ह्मणजे सिंधी मुसलमान असून, ते केवळ टाकभाड्याचे ह्मणजे पगाराचे चाकर होते. त्यांचेमध्यें स्वदेशाभिमान किंवा स्वराजनिष्ठा हे गुण मुळींच नव्हते. पूर्वी त्यांनीं आपल्या बाक्यांकरितां राण्याचा सुद्धां पदर धरण्यास मागें पाहिलें नाहीं. ते इतराला कोठून जुमानणार होते, हें उघडच दिसत होतें. परंतु, पूर्वी अमरचंदानें, शहाणपणानें त्या सर्वांस त्यांच्या बाक्या वगैरे देऊन टाकून पुनः आपल्या कामाला लागण्यास त्यांना ताजा दम आणिला होता. ह्या सर्व गोष्टी नुत्त्याच वर सांगितल्या आहेत. राणा उरसी हा, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, आपला कारभार सोडून शिकारीपारधीच्या नादीं लागून बुंदीप्रांताकडे गेला; तेव्हां, त्याचा उदेपूरचा कारभार मुख्यत्वें साळुंब्र्याच्या राजाकडेच होता. असें पाहूनै, सिंधी लोकांनीं आपल्या पगाराच्या ज्या बाक्या आलीकडे राहिल्या होत्या त्या साळुंब्र्याच्या

सरदाराकडे मागितल्या. परंतु, त्या जेव्हां त्यांस मिळण्याची आशा दिसेनाशी झाली तेव्हां त्यांनीं शेवटीं असाही विचार केला कीं, साळुंब्याच्या सरदाराला धरून व त्यास तापलेल्या तव्यावर उभें करून, त्याजकडून आपल्या सर्व बाक्या काढाव्या. इतक्यांत बुंदीस राण्याकडे अमरचंद गेला होता तो अकस्मात् उदेपुरास परत आला. अमरचंदाला, अशा खवळलेल्या लोकांस कसें शांत करावें, हें पूर्वानुभवावरून पूर्णपणें माहीत होतेंच. त्याचप्रमाणें आपल्या राण्याचे वंशाची अब्रू कायम राहून, लोकांना सौख्य मिळेल अशा प्रकारच्या सर्व तजविजी करण्यास तो नेहमीं जपत असे. तिकडे राण्याचा तर घात झाला होता. गादीचा मालक अज्ञान बालक असून, त्याला गादीवर येऊं न देण्याविषयींच्या अनेकांकडून अनेक खटपटी चालल्या होत्या, हें त्यास माहीत होतें. तेव्हां, अशा वेळीं सिंधी लोकांसही आणखी चेतूं दिल्यास उदेपूरची गादी हातची सुटून ती भलत्याचेच ताब्यांत जाणार; हीं सर्व धोरणें लक्षांत बाळगून, अमरचंदानें सर्वत्र स्वस्थता आणि शांतता राखण्याविषयीं आपल्याकडून झाल्या त्या योग्य तजविजी करण्यास बिलकुल आळस केला नाहीं. अमरचंद उदेपूरच्या गादीविषयीं इतका जरी रात्रंदिवस जपून, त्याबद्दलची अतिशय काळजी बाळगीत होता, तरी, ह्यामध्यें आपल्याला बिलकुल यश न मिळतां, गादीचे मालक आपल्याला अधमपणानें अपयश दिल्याशिवाय खचीत राहणार नाहींत, हें त्याला पहिल्यापासूनच कळून चुकलें होतें. तथापि, होईल तितकी आपण स्वत: घस सोसून गादीची एकनिष्ठपणें चाकरी करण्याचा त्याचा निश्चय होता. अमरचंदाकडे उदेपूरच्या संबंधानें जो मुख्याधिकार होता त्या अधिकाराविषयीं त्याचा हेवा करून मत्सर बाळगणारे उदेपुरास कमी लोक होते असें नाहीं; परंतु, अमरचंदाचा निर्लोभ, त्याची कर्तव्यतत्परता, आणि त्याची एकनिष्ठ चाकरी हीं बघून त्याचे संबंधानें कोणाला तोंडाबाहेर ब्र देखील काढण्याची छाती होत नसे. आपल्याला आपला अधिकार कायम राखणें मोठें मुष्किलीचें आहे; आणि आपल्या अधिकाराबद्दल मत्सर करणारे असे पुष्कळ लोक आपल्या बरोबरीनें उदेपूरच्या दरबारीं आपले दोष हुडकून काढण्यास डोळ्यांत तेल घालून बसले आहेत; ह्या गोष्टी अमरचंदास गैरमाहित नव्हत्या. व त्यामुळें त्याच्या वर्तनांत तर विशेष सावधपणा आणि निर्मलता दिसत असे. वर सांगितलेले चेतलेले सिंधी लोक अमरचंद उदेपुरास आल्याबरोबर लागलेच आपाप शांत होऊन, त्यांनीं आपल्या पगाराच्या संबंधानें कोणत्याही प्रकारचा उतावळेपणा आणि गैरशिस्त वर्तन दाखविलें नाहीं. राणा उरसी मेल्यामुळें आतां उदेपुरास बालराजा झाला व त्याची सर्व प्रकारें मुखत्यार त्याची आई झाली हें बघून, तिच्या मनांत आपल्याविषयीं किंतु न येऊन व चुगलखोरांच्या चुगल्यांनीं तिचें मन भ्रष्ट न

होऊन, तिनें आपल्याबद्दल आपलें मन स्वच्छ ठेवावें ह्मणून, त्यानें आपल्याजवळ जी काय राजदरबाराकडून मिळालेली चीजवस्तु होती ती सर्व, निरनिराळ्या यादी करून, मोठमोठ्या तबकांत भरून राणीसाहेबांकडे नजर पाठविली. ह्या ताटांमध्यें त्यानें आपलें एकंदर सोनें, मोतीं, जवाहीर, आणि आपल्या दरबारच्या पोषाखासुद्धां लत्तेकपडे राणीसाहेबांकडे पाठवून दिले. अमरचंदाची ह्या प्रकारची निर्लोभता पाहून राजमाता तर चकित झाली; व यामुळें अमरचंदाविषयींचे संशय अथवा किंतु नाहींसे होऊन त्याचा मत्सर करणाऱ्यांपैकीं कोणासच त्याचे विरुद्ध बोलण्यास सवड होण्याची मुष्कील झाली. अमरचंदाकडील आलेलीं तबकें राणीनें बघून, तीं पुन: तिनें अमरचंदाकडे परत पाठविलीं; व त्यांचा पुन: स्वीकार करण्याविषयीं तिनें त्यास आपली इच्छा दर्शविली. परंतु, अमरचंदानें, ज्या अर्थी राणीसाहेबांचीच इच्छा होती त्या अर्थी, त्या परत आलेल्या तबकांतून, नेहमीं वापरण्याचे कपड्यांचा मात्र स्वीकार केला. येणेंकरून, अमरचंदाचेविषयीं कोणत्याही प्रकारें राणीचें वाईट मत होण्याचें कारण उरलें नाहींच.

परंतु ही राणी मोठी कैदाशीण होती! ती गोगुंड्याची राजकन्या असून, तिला जे मसलतगार मिळाले होते ते असावे तसे नव्हते. ती यद्यपि बुद्धिमती आणि राजकारस्थानी असे, तरी ती स्त्रीच असल्यामुळें वाईट मसलतगारांच्या अनुसंधानानें वागे. उदेपूरच्या राजघराण्यांत एक तरुण मनुष्य कांहीं कामावर होता, त्याच्या मसलतीनें आणि तंत्रानें राणी वागत असे. ती वेळ ह्मणजे अशा भलत्याच्याच मसलतीनें वागण्याची नव्हती. जो खरा कारस्थानी तोच त्या धामधुमींत उदेपुरास टिकावयाचा होता. तेव्हां, राणीचा तो तरुण मसलतगार एके वेळीं दरबारच्या हितचिंतक लोकांकडून ठार मारला गेला. असें झालें तेव्हां राणीला चोंडावत सरदारांचा पाठिंबा मिळून, ती दिवाण अमरचंद यास जुमानीनाशी झाली. अमरचंदाची उदेपूरच्या दरबाराशीं आणि खुद्द राजघराण्याशीं कशी वागणूक होत आली होती ती येथपर्यंत सांगण्यांत आलीच आहे; त्यानें बिथरलेल्या सिंधी लोकांस शांत करून, त्यांना उदेपूरच्या गादीचे मोठे अभिमानी आणि राजनिष्ठ असें बनविलें; त्यांचे साह्यानें त्यानें मराठ्यांना उदेपूरशहरावर येऊं दिलें नाहीं; आणि, अशा परचक्रापासून उदेपूरचा सर्व मुलूख राखला. हे सर्व राजघराण्यावर त्याचे कमी उपकार होते असें नाहीं. परंतु, त्या उपकारांची किंमत त्या भलत्यांच्याच मसलतीनें वागणाऱ्या राणीला कोठें कळत होती? दिवाण अमरचंद इतक्या प्रामाणिकपणानें आणि हितबुद्धीनें वागत असतां, राणीनें आपल्या चोंडावत सरदारांचे साह्यानें आणि मसलतीनें त्याचा धडधडीत अपमान करून, ती त्याचेविषयींचा द्वेष दर्शवूं लागली. हें कृतघ्न-

पश्चार्चे फल जेव्हां अमरचंदाला दिसूं लागलें तेव्हां त्याचा मोठा संताप होऊन गेला. एकदां तर अशी गोष्ट झाली कीं, राणीच्या दासीगणापैकीं आणि खुषमस्करिणीपैकीं एक स्त्री उठून दिवाण अमरचंद याजकडे गेली; आणि कांहीं तरी मनःकल्पित निमित्तानें ती राणीची मुखत्यार अशा नात्यानें त्याशीं बेजबाब बोलूं लागली. अमरचंद हा पहिल्यापासूनच मोठा फटकळ आणि तेज पुरुष होता. तो खुद्द राण्याला देखील प्रसंगानुसार दाबून एकीकडे बसवून, आपल्याला योग्य वाटेल त्याप्रमाणें करण्यास मागें पुढें पाहणारा नव्हता; तो अमरचंद, राणीच्या ह्या लवंडीचें हें असें निंदेचें भाषण ऐकूनही स्वस्थ बसणारा नव्हताच. त्या रामप्यारीचें (हें त्या राशीसखीचें नांव होतें) भाषण ऐकून अमरचंदाचें मस्तक रागानें फिरून जाऊन तो तिला ह्मणाला, 'चल जा येथून निघून ! चोमडी कुत्री ! कुत्र्याची रांड !' दिवाणजींच्या तोंडून ह्याप्रमाणें निर्भर्त्सना झाल्यावर रामप्यारी आपल्या धनिनीकडे गेली, आणि तिनें तिला तिखटमीठ लावून, 'दिवाणजींनीं आपली व खुद्द राणीसाहेबांची अतिशय निंदा केली; व ज्यांचा उच्चारही करूं नये अशा शेंकडों शिव्या त्यांनीं राणीसाहेबांस दिल्या' वगैरे खोट्यानाट्या अनेक गोष्टी सांगून, राणीचें मन दिवाण अमरचंदाविषयीं विशेष भ्रष्ट केलें. रामप्यारीच्या तोंडून राणीनें दिवाणजींनीं केलेली निंदा आणि अपमान ऐकून ती एकदम कांहींएक विचार न करितां, एका डोलींत बसली; आणि ही सर्व हकीकत साळुंब्र्याच्या राजाचे कानावर घालण्याकरितां उदेपुराहून तडकाफडकी निघाली. तिच्या मनांत, साळुंब्र्याच्या ठाकुरास ही सर्व हकीकत सांगितली ह्मणजे तो ह्याबद्दल योग्य विचार करून दिवाण अमरचंद याचा चांगला समाचार घेईल, असें होतें. दिवाण अमरचंद यास अशा प्रकारची घालमेल राणीकडून खास होणार असें अगोदरच अनुमान होतें; व त्याप्रमाणें, शेवटीं राणी डोलींत बसून आपल्यावर फिर्याद करण्यासाठीं साळुंब्र्याच्या ठाकुराकडे जाण्यास निघाली असें त्यास समजल्यावर, तो ताबडतोब आपल्याबरोबर स्वार वगैरे घेऊन निघाला; आणि वाटेंतच तिला भेटून तिची डोली त्याणें उभी केली, व डोलकरांना, डोली मागें परतविण्यास हुकूम केला. त्या वेळीं दिवाणजींचा हुकूम अमान्य करण्याचें कोणाला धैर्य होतें ? डोलकरांनीं ती डोली तशीच पुनः उदेपुरास राजवाड्याकडे फिरविली. राजवाड्याजवळ डोली येऊन थांबली आणि राणीसाहेब राजद्वारामध्यें डोलींतून बाहेर पडल्या. तेव्हां अमरचंद पुढें होऊन, त्याणें रीतीप्रमाणें मोठ्या अदबीनें तिला मुजरा केला, आणि ह्मटलें, 'आपण स्वतः ह्याप्रमाणें आपल्या कामासाठीं डोलींत बसून आपल्या राजवाड्यांतून बाहेर पडणें ह्मणजे आपल्या राजकुलाचे नांवाला मोठा कमीपणा आहे. आपलें काम कसेंही महत्वाचें

आणि कोणत्याही प्रकारचें असो; परंतु, आपण राजवाड्याचे बाहेर पडणें हा मोठा लोकापवाद आपल्याकडे येतो, याबद्दलचा अगोदर विचार करावयास पाहिजे होता. एखाद्या अगदीं भिकाऱ्याची बायको देखील तिला वैधव्य आल्यानंतर निदान सहा महिने तरी आपल्या घराचे बाहेर लोकलज्जेस्तव पडत नाहीं; आणि, आपण राजपत्नी, व सर्व राजस्थानाला परम पूज्य आणि वंद्य अशा राजमाता, असें असून, व आपले प्रिय पति राणेसाहेब अपघातानें मारले गेल्यास अजून सहा महिनेही झाले नाहींत तोंच, आपण खुशाल डोलीमध्यें बसून उदेपुर नगराचे बाहेर जावयास निघणें, ही मोठ्या शरमेची आणि आपल्या योग्यतेबाहेरची गोष्ट आहे. याबद्दल आपल्याला कांहींच विधिनिषेध वाटूं नये ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे ! शिष्टाचार आणि लोकसंप्रदाय यांस न मानतां, जे कोणी स्वेच्छेप्रमाणें वागतात त्यांचा दुर्लौकिक होऊन बदनामी होते हें प्रत्येकानें समजून त्याप्रमाणें वागलें पाहिजे. हें तुम्हांस मीं सांगितलें पाहिजे असें नाहीं.' शेवटीं अमरचंद राणीला म्हणाला, 'मी सदैव तुमच्या व तुमचे राजछत्रधारी पुत्राच्या कल्याणाविषयीं माझ्या कर्तव्याप्रमाणें जपत असतां व त्याबद्दलची सर्व जबाबदारी मी आपल्या माथ्यावर वागवीत असतां, मला आपण सर्व प्रकारें जास्त जास्त उत्तेजन देऊन माझी सेवाचाकरी मान्य करावयाची; आणि आपल्या राजकुलाचें व एकंदर प्रजाजनाचें शांतिस्वास्थ्य कायम राखण्याकडे नजर द्यावयाची; तसें न करितां, मी करतो त्या सर्व गोष्टींस हरप्रसंगीं मोडा घालून, असे नाना प्रकारचे ढंग करतां, हें कोणत्याही प्रकारें तुम्हां स्वतःला आणि एकंदर राज्याला हितप्रद होईल असें मला वाटत नाहीं ! याचा तुम्हीं शांततेनें आणि गंभीरपणानें विचार करावा, अशी माझी सविनय सूचना आहे.' इतकें दिवाण अमरचंद याणें राणीला सांगितलें तरी बायजीराजे[1] यांचे लक्षांत तो हितबोध नीट रीतीनें उतरला नाहीं. राणी ही तरुण, कावेबाज, कारस्थानी आणि महत्वाकांक्षी असल्यामुळें तिच्या मनांतील दिवाणजींचे संबंधाची अढी बिलकुल कमी न होतां, तिणें त्या वेळीं अमरचंदास कांहींएक उत्तर केलें नाहीं. कारण, तिला माहीत होतें कीं, दिवाणजींच्या पुढें एक शब्दही बोलण्याची आपली प्राज्ञा नसून ते आपल्या बोलण्याला दबणारे नव्हेत. असा विचार करून, तिणें ती वेळ तशीच मारून नेली. तथापि, तेव्हांपासून तिच्या मनांत दिवाण अमरचंद जो एवढा आपल्याला डोईजड झाला आहे तो मेल्याखेरीज आपल्या हेतूप्रमाणें गोष्टी घडावयाच्या नाहींत, असे विचार रात्रंदिवस घोळूं लागले. पुढें लौकरच अमरचंद मेला. परंतु, तो आपल्या मरणानें मेला नसून, त्याला राणीकडून विषप्रयोग झाला असावा, असा लोकांचा तर्क आहे. अमरचंद मेला खरा;

---

१. राजमाता. रजपुतांमध्यें राजाचे आईला 'बायजीराज' असें म्हणतात.

परंतु राजस्थानांत त्याचे नांवाचा जो लौकिक झाला तो एकंदर हिंदुस्थानाचे इतिहासांत अगदीं अपूर्व व अद्वितीय आहे, यांत संशय नाहीं. त्यानें आमरणान्त आपल्या देशाची आणि राजाची सेवा करण्यांत निर्लोभतेनें आपलें आयुष्य घालविलें. तो मेला तेव्हां त्याच्या प्रेतक्रियेला पुरेसें द्रव्यही त्याच्या संग्रहाला शिलक नव्हतें ! तेव्हां, त्याच्या प्रिय नागरिक बांधवांनीं आपल्यांमध्यें वर्गणीनें पैसे जमवून त्याचा श्मशानविधि यथास्थितपणें उरकला ! दिवाण अमरचंदासारखा लोकहितैषी मनुष्य, कोणत्याही काळीं आणि कोणत्याही सुधारलेल्या देशांत, लोकहितवादाला ह्मणून जेथें मान आहे तेथें, अत्यंत पूज्य आणि सन्माननीय होईल, याविषयीं तर बिलकुल शंका नाहींच. जेथें सद्गुणांना ह्मणून मान आहे तेथें अमरचंदाचे सद्गुणांची चहा होऊन, त्याला सर्वांकडून अग्रमान मिळण्यासारखा तो पुरुष होता. परंतु, त्याच्या त्या सद्गुणांचें चीज उदेपूरच्या दरबारांत बिलकूल झालें नाहीं. त्याणें आपल्या राण्याची अब्रू आणि मान राहावा ह्मणून आपलें सर्वस्व अर्पण केलें; आणि त्याचें राज्य रहावें ह्मणून तो आजन्म स्वधर्मानें झटला. त्याणें उदेपूरच्या राज्यांतून पैसा गोळा केला नाहीं; आणि त्याणें आपलें नांव ह्मणजे एक अप्रतिम उदाहरण करून ठेविलें. हा त्याचा थोरपणा मेवाडांतील लोक विसरले नाहींत. त्यावरून, जग हें सद्गुणावांचून नाहीं आहे; व जेथें कोठें सद्गुण, विरलतेनें कां होईनात, या जगावर आहेत, तेथें त्या मानानें त्या सद्गुणांचें अभिनंदन करणारेही थोडेबहुत लोक सांपडतात, असें ह्मणावें लागतें. अमरचंदाचे सद्गुणांवरून त्याचे पश्चात् मेवाडप्रांतांत त्याचे नांवाचा जो चोहोंकडे लौकिक झाला आणि त्याचें नांव जें सर्वत्र उच्चारलें जात आहे, त्यावरून, ह्या देशांत लोकमत नाहीं व लोकांना चांगल्यावाइटाची परीक्षा व अभिमान नाहीं, असें जें कित्येक पाश्चात्य ग्रंथकारांचें मत आहे, तें सर्वथैव खोटें आहे, असें ह्मणावें लागतें. अमरचंदाच्या बाणेदारपणाच्या आणि न्यायनीतीच्या ज्या गोष्टी राजस्थानामध्यें प्रसिद्ध आहेत, व त्याच्या रीतिभातींनीं राहणारांस जें तिकडे अमरचंदी[1] असें विशेषण मिळतें, त्यावरूनच, ह्या देशांत सद्गुणांना किती मोल आहे हें समजून येण्यासारखें आहे. अमरचंदाची राजनिष्ठा, देशप्रीति आणि सचोटी हीं कोणत्याही देशांत अनुकरणीय होतीं. असो.

वि० सं० १८३१ ह्मणजे इ० स० १७७५ ह्या वर्षी चोंडावत पक्षापैकीं मेघावत ह्या नांवाच्या एका टोळीचा मुख्य बेगू नांवाच्या संस्थानचा ठाकुर होता, त्याणें बंड केलें. तेव्हां तें बंड मोडण्याकरितां राणीनें शिंद्याला बोलावून आणणें

---

१. राजस्थानांत 'अमरचंदी रीत' ह्मणून झटली, ह्मणजे ती सत्य आणि धीर यांनीं युक्त अशी समजली जाते. आणि हेच गुण अमरचंदामध्यें वसत होते.

भाग झालें. त्याप्रमाणें शिंदा राणीच्या साह्यास येऊन, त्याणें, बंडवाल्यांनीं घेतलेले सर्व गांव उदेपुराकडे परत आणिले; व आणखी त्या बंडवाल्यांवर त्या लढाईच्या खर्चाबद्दल १२ लक्ष रुपये खंडणी बसविली. बंडवाल्यांनीं उदेपूरचे जे गांव घेतले होते ते शिंद्यानें उदेपूरच्या वतीनें बंडवाल्यांपासून वर लिहिल्याप्रमाणें परत घेतले व ते पुनः उदेपुराकडे परत द्यावयाचे खरे; परंतु, तसें न करितां, ह्मणजे, बालराण्याचे गांव बालराण्यास परत न देतां, ते सर्व त्याणें आपला जांवई बहिरजी जगताप यालाच दिले ! हे गांव ह्मणजे रतनगडखेरी आणि सिंगोली असे दोन होते.[1] याचप्रमाणें, शिंद्यानें आणखी याच वेळीं, होळकरालाही इर्णिया, जाठ, बिचूर, व नदोयी हे ६ लक्षांचे महाल राण्याकडून घेऊन मिळवून दिले. याप्रमाणें, शिंद्याचा पाय उदेपुरामध्यें शिरला मात्र, तों त्याणें आपल्या मराठ्यांच्या घरांत उदेपुरचा मुलूख आणि उदेपुरची संपत्ति हीं घालण्याचा एकसारखा सपाटा चालविला. ह्याप्रमाणें मराठ्यांनीं उदेपुराकडून आपण केलेल्या साह्याबद्दल इतके महाल उपटले; तरी आणखी, वि० सं० १८३०-३१ (इ० स० १७७४-७५) ह्या वर्षीं चारें[2] आणि वि० सं० १८३६ (इ० स० १७८०) ह्या वर्षी तीनें[3] मिळून एकंदर सात खंडण्या बसविल्याच. आणि, त्या खंडण्यांचे पैसे देण्यास उदेपुरच्या खजिन्यांत शिल्लक नसल्यामुळें त्या खंडण्यांच्या वसूलीपुरता मुलूख तोडून घेतला. येणेंप्रमाणें, मराठ्यांनीं होईल तिकडून उदेपूर ह्मणजे मेवाडप्रांत सावडण्यास सुरुवात केली होती.

---

१. शिंद्यानें हे गांव आपल्याकडे घेतले त्याबद्दलचा एक स्वतंत्र तहनामा झाला आहे. व तो तहनामा अद्यापि कायम आहे. त्यांत असें स्पष्ट झालें आहे कीं, खंडणीचे सर्व पैसे वसूल झाले ह्मणजे हे सर्व गांव परत देऊं. त्याप्रमाणें उदेपूरचा राणा त्या गांवांबद्दल अजून शिंद्यावर दावा सांगत आहे. आणि, इंग्रज सरकाराबरोबर जो राण्याचा सन १८१७-१८ ह्या वर्षीं तह झाला आहे त्या तहनाम्यांत देखील, शिंद्यापासून हे आमचे गाव आह्मांस परत द्यावे, ह्मणून एक कलम आहे. परंतु, त्या गोष्टीस अर्ध शतकावर दिवस होऊन गेल्यामुळें, आणि खऱ्या हक्कवारशापेक्षां वहिवाटीचा वारसा आणि हक्क इंग्रजी कायद्यांत जास्त मानीत असल्यामुळें, आतां शिंद्याकडून राण्याचे गांव राण्याला परत मिळण्याची आशा नाही.

२. मराठ्यांनीं घेतलेल्या त्या चार खंडण्याः—महादजी शिंद्यानें बेगू येथील बंडाबद्दल इ० स० १७७५ सालीं पहिली खंडणी घेतली; दुसरी, गोविंदराव आणि गणपतराव यांचे मार्फत बहिरजी जगताप याजकडे लाविलेली खंडणी; तिसरी, अंबाजी इंगळे याणें घेतलेली खंडणी; आणि चौथी, बापू होळकर व दादोजी पंडित यांणीं घेतलेली खंडणी.

३. ह्या तीन खंडण्या ह्मणजेः—पहिली, होळकराचे तर्फे आप्पाजी व मकाजी गिते यांणीं घेतली ती; दुसरी, तुकोजी होळकरानें सोमाजीचें मार्फत घेतली ती; आणि तिसरी सोमाजीचे मार्फतच अल्ली बहादूर याणें घेतली ती.

राण्याचे घरांत आपसांतले तंटे आणि मराठ्यांची वर लिहिल्याप्रमाणें एकसारखी लूट, ह्यामुळें उदेपुरदरबारची कळा दिवसेंदिवस अगदींच जात चालली. आणि अशा स्थितींतच बालराणा हम्मीर हा वि० सं० १८३४ ह्मणजे इ० स० १७७८ ह्या वर्षी मरण पावला. त्या वेळीं तो पुरासा आपल्या वयांतही आला नव्हता. त्याचें वय अवघें १८ वर्षांचें होतें.

येथपर्यंतच्या एकंदर इतिहासावरून पाहिलें असतां, इ० स० १७३६ सालीं मराठे राजस्थानांत शिरले. तेव्हांपासून तों हम्मीर राण्याच्या मृत्यूपर्यंत, ह्मणजे इ० स० १७७८ या वर्षापर्यंत, मेवाडच्या राज्यास आणि संपत्तीस जी उतरती कळा लागली ती एकसारखी तशीच पुढें चालली होती; व मेवाडच्या राज्याचा पूर्वीचा लौकिक, डौल, आणि वजन हीं सर्व ऱ्हास पावत चाललीं. ह्या अशा नांवलौकिकाच्या देशाला इतका नादानपणा आणण्यास ज्या लुटारू आणि स्वार्थी लोकांच्या स्वाऱ्या कारण झाल्या, त्यांची नांवनिशी देत बसण्यांत काळ आणि स्थळ यांचा मात्र व्यर्थ खर्च होणार आहे. असो. मोंगलांचे अमलांत न्याय व कांहीं रीतभात तरी होती; परंतु, मराठ्यांना न्याय, रीतभात आणि दुसऱ्याच्या सुखदु:खाविषयींचा विचार हीं तर बिलकुल नव्हतीं. त्यांचा काय तो एक लुटीचा हेतु. आणि ह्यासाठींच ते एकामागून एक टोळ्यांटोळ्यांनीं जमून मेवाडावर येत, व यथेच्छ लूट करून जात. शिवाय, राण्यापासून, त्याचे सरदारांपासून आणि त्याचे भाऊबंद वगैरेंपासून खंडण्यांच्या रूपानें वाटेल तसा पैसा ओढीत तो वेगळाच. त्यांना अंमळ कोठें पैसा असल्याचा सुगावा लागला कीं, पुरे. त्यांच्या आपल्या टोळ्या जळवांसारख्या तें द्रव्यशोणित ओढण्यास व शोषून घेण्यास तेथें हजर असत. आणि जेथें एकदां त्यांचें शोषण व ओढ लागे तेथें केवळ खराटा फिरला असें होई ! मराठ्यांनीं मेवाडच्या

---

१. इंग्रजी ईस्ट इंडिया कंपनीचे कामदारांनीं इकडे राज्य स्थापन करण्याचे प्रारंभाला मराठ्यांप्रमाणेंच धामधूम करून निघेल तितका पैसा काढला व दाबवेल तितका मुलूख दाबिला; ह्या गोष्टी इतिहासप्रसिद्ध आहेतच. काशीचा राजा, लखनौची बेगम आणि बंगाल्याचा सुजाउद्दवला इत्यादिकांपासून त्या वेळच्या इंग्रजकामदारांनीं कोट्यवधि रुपये अन्यायानें आणि जुलमानें घेतले. त्याचप्रमाणें, लॉर्ड डालहौसी यांणीं पंजाब, नागपूर व सातारा वगैरे राज्यें बुडवून जप्त केलीं. याप्रमाणें, जो जबरदस्त होतो तो असाच अशक्तांवर जुलूम करून स्वार्थ साधतो. राज्यतृष्णेमध्यें धर्मबुद्धि आणि न्यायानुवर्तन हीं क्वचितच आढळतील ! वर लिहिल्याप्रमाणें इंग्रजांनीं इकडे पुष्कळ रुण्हार केला; तरी, बडोदें, ह्मैसूर, धार वगैरे दाबलेलीं संस्थानें परतही केलीं, हीं त्यांच्या उत्तम नेकीचीं व न्यायाचीं उदाहरणें आहेत. व तें त्यांना भूषण आहे यांत संशय नाहीं. असा समंजसपणाचा प्रकार मराठ्यांकडून मुळींच झाला नाहीं.

राण्यांपासून पुढें लिहिल्याप्रमाणें निरनिराळ्या सालीं मिळून १८१ लाख रुपयांच्या खंडण्या मिळविल्या:—

६६ लाख रुपये वि० सं० १८०८ (इ० स० १७५२) ह्या वर्षी जगत्सिंग राण्याकडून होळकराला मिळाले;

५१ लाख रुपये वि० सं० १८२० (इ० स० १७६४) ह्या वर्षी प्रताप आणि उरसी राणा यांजकडून आणखी होळकरालाच मिळाले; आणि,

६४ लाख रुपये वि० सं० १८२६ (इ० स० १७७०) ह्या वर्षी उरसी राणा यानें महादजी शिंद्याला दिले.

मिळून १८१ लाख रुपये झाले.

याशिवाय, मराठ्यांनीं पुढें लिहिल्याप्रमाणें मेवाडांतून २८॥ लाखांचे महाल उपटले ते वेगळेच:—

९ लाख रुपयांच्या वसूलीचे रामपुरा व भानपुरा हे महाल वि० सं० १८०८ (इ० स० १७५२) ह्या वर्षी घेतले.

४॥लाख रुपयांच्या वसूलीचे जावद, जीरण, नीमच, आणि निबहैरा हे महाल वि० सं० १८२६ (इ० स० १७७०) ह्या वर्षी घेतले.

६ लाख रुपयांचे रतनगडखेरी, सिंगोली, इर्णिया, जाठ, बिचूर, आणि नदोयी वगैरे महाल वि० सं० १८३१ (इ० स० १७७५) मध्यें घेतले. आणि वरील सालींच—

९ लाख रुपयांचा गोदवाड हा महाल घेतला.

एकून २८॥ लाख रुपये झाले.

येणेंप्रमाणें, मराठ्यांनीं खंडण्या आणि महाल मिळून सुमारें २१० लाख रुपयांची मिळकत उघड उघड मिळविली. ह्याशिवाय, वर लिहिल्याप्रमाणें, इतर लुटींच्या मार्गानें, आणि राण्याचे सरदारांपासून, व इतर आप्तसंबंधी लोकांचे मुलखांतून, तेथें तेथें स्वस्थता राखण्यासाठीं ह्मणून वगैरे जो पैसा उपटीत तो सर्व मिळून, एकत्र केला तर, तो निदान ५ कोटींच्या जवळ जवळ तरी येईल. तेव्हां, मराठ्यांना मेवाडप्रांतांतून एकंदर ७ कोटी रुपयांवर प्राप्ति झाली, असें उघड दिसतें. येणेंकरून, मेवाडप्रांताला खरोखर बराच धक्का बसला. परंतु, तो मुलूख चांगला असल्यामुळें, लोकांनीं त्याबद्दल फारशी फिकीर बाळगिली नाहीं. तरी, उदेपूरच्या गादीला जो उतरता पाया लागला तो पुनः ह्मणून पूर्वस्थितीवर आला नाहीं, व तेव्हांपासून उदेपूरच्या खजिन्यामध्येंही यावी तशी बर्कत आली नाहीं. आणि तसेंच, उदेपुरामध्यें जें दारिद्य शिरलें तेंही त्या वेळेपासून ह्मणण्यासारखें सांवरलें नाहीं!

# भाग पंधरावा.

## राणा भीम व इंग्रजांशीं तह.

राणा भीम उदेपूरच्या गादीवर बसतो.—शिवगड येथील भांडण.—राणा जप्त केलेल्या जमिनी खंडण्या देऊन परत मिळवितो.—राण्याच्या फौजेवर अहिल्याबाईची स्वारी.—तिचा पराजय. चोंडावत रजपुतांचें बंड.—दिवाण सोमाजी याचा वध—बंडवाल्यांचा चितोडावर ताबा.—राण्याकडून महादजी शिंद्याला बोलावणें.—त्याचा चितोड शहराला वेढा.—बंडवाल्यांवर त्याचा जय.—मेवाडांत अधिकारवृद्धि करण्याविषयींचे झालिमसिंगाचे बेत.—त्याचेविरुद्ध अंबाजीचें वर्तन.—अंबाजी आपल्याला सुभेदार ह्मणवितो, व त्याबद्दल लखबा याचें भांडण.—ह्या भांडणांचा परिणाम.—झालिमसिंग जहाजपूर घेतो.—होळकराची मेवाडावर स्वारी.—त्याचा नाथद्वाराच्या पुजाऱ्यांस प्रतिबंध.—कोटारियोच्या ठाकुरांचें शौर्य.—लखबाचा मृत्यु.—मराठ्यांच्या पुढाऱ्यांस राणा पकडतो.—झालिमसिंग त्यांस सोडून देतो.—होळकर पुन: उदेपुराकडे येतो.—उदेपुरावर जबरदस्त खंडणी बसते.—शिंद्याची स्वारी.—त्याचें इंग्रजांशीं भांडण व त्याविषयींचा खुलासा.—मेवाडाचे भाग पाडण्याविषयीं अंबाजीच्या युक्तया.—त्या युक्तयांची व्यर्थता.—मेवाडची राजकन्या कृष्णाकुमारी इच्यासाठीं भांडणें, आणि सर्व राजस्थानांत लढाया.—ह्या लढायांस व भांडणांस कृष्णाकुमारीचा बलि.— मीरखान आणि अजितसिंग.—त्यांची लुच्चेगिरी.—उदेपूर येथें शिंद्याच्या कचेरींत इंग्रजी वकील.—अंबाजीचा अपमान, आणि त्याचा आत्मघात करण्याविषयीं प्रयत्न.—मीरखान आणि बापू शिंद्या हे मेवाड ओसाड पाडतात.—राण्याचा इंग्रजांशीं तह.

उरसी राण्याच्या दोन मुलांतील वडील मुलगा हम्मीर हा उदेपूरच्या गादीवर राणा झाला; परंतु तो अल्पवयांतच मेला, हें पूर्वभागांत सांगितलेंच आहे. त्या हम्मीर राण्याचे मागून त्याचा धाकटा भाऊ भीमसिंग हा वि० सं० १८३४ ह्मणजे इ० स० १७७८ ह्या वर्षी उदेपूरच्या गादीवर बसून मेवाडचा राणा झाला. राणा भीमसिंग हा, आलीकडील ४० वर्षांत उदेपूरच्या सिंहासनावर जे बालराणे झाले त्यांत चौथा बालराणा होता. हा राणा ५० वर्षें उदेपूरच्या गादीवर होता. परंतु तेवढ्या कारकीर्दीत मेवाडांत ज्या गोष्टी आणि बलबली झाल्या, त्या, येथपर्यंत जो उदेपूरचा इतिहास लिहिला त्याच्या बरोबरीनें घडल्या, असें ह्मटलें तरी चालेल. राणा भीमसिंग हा गादीवर बसला तेव्हां त्याचें वय केवळ ८ वर्षांचें होतें; आणि त्यामुळें, त्याला वयांत येईपर्यंत पुष्कळ दिवस आपल्या भावाप्रमाणेंच आपल्या आईच्या ताब्यांत रहावें लागलें. अशा परवशतेमुळें त्याच्या स्वभावांत आणि वागणुकींत पुष्कळ प्रकारचे दोष उत्पन्न झाले व ते शेवटपर्यंत कायम राहिले. तो स्वभावतःच धैर्याचा कोता असून, त्यामध्यें, बहुत दिवसपर्यंत त्याचा राज्यकारभार स्वस्थतेचा नसल्यामुळें, त्याला वेळेवर जो कोणी जशी मसलत देई त्याप्रमाणें त्याचा कल होई.

राणा उरसी याचे कारकीर्दीत उद्भवलेलें तोतयाचें बंड यद्यपि दबलें होतें, तथापि, त्याचें अगदीं निर्मूलन झालें नव्हतें. तो तोतया अद्यापि जीवंत होताच. परंतु, त्याचा पक्षपाती आणि त्याला उत्तेजन देणारा असा कोणीच न राहिल्यामुळें, तो बहुतकरून मेवाडच्या लोकांचे स्मृतिबाह्य झाला होता. आणि त्यामुळें, तो कधीं मेला हें देखील कोणास ठाऊक नाहीं. ह्याप्रमाणें, मेवाडच्या राज्यांतलें प्रतिस्पर्धीपणाचें राज्यकारण मोडलें; तथापि, आपसांतले तंटे आणि आपसांतलीं वैरें हीं कायम असून, तीं दिवसेंदिवस वाढत चालल्यामुळें, देशाला खराबी येण्याला जो प्रारंभ झाला होता त्यामध्यें बिलकुल कमी मान नव्हतें. वि० सं० १८४० (इ० स० १७८४) मध्यें चोंडावतांनीं आपले जुने प्रतिपक्षी जे सुक्तावत, त्यांच्याशीं तंटा उपस्थित केला. ह्या वेळीं उदेपूरची दिवाणगिरी सालुंब्र्याच्या सरदाराकडे असून, त्याचे मदतगार त्याचेच आप्त, कोरावड येथील अर्जुनसिंग[1] आणि अमाइतचा प्रतापसिंग[2] असे दोघे कारस्थानी सरदार होते. त्याचप्रमाणें, पूर्वीची सिंधी मुसलमानांची पगारी फौज कायम असून, तिच्यावर चंदन आणि सादिक हे दोघे मुख्य होते. ह्या सर्वांचा पक्ष चोंडावतांकडे असून, त्यांणीं एकत्र होऊन सुक्तावतांचा मुख्य सरदार मोहकिम याच्या भैंदर किल्ल्याला वेढा घालून त्याजवर तोफा लावल्या.

सुक्तावतांपैकीं संग्रामसिंग ह्मणून एक सरदार होता. हा पुढें मेवाडच्या इतिहासांत बराच प्रसिद्धीस आला आहे. त्यानें चोंडावतांची गडबड बघून, त्यांची जी पुरावत ह्मणून एक शाखा होती तिचा लव्हा[3] नामक एक किल्ला शिड्या लावून मोठ्या शौर्यानें काबीज केला. आणि, तेथून तो कोरावडावर जाऊन नंतर भैंदर किल्ल्यावर गेला. कोरावडचा ठाकुर अर्जुनसिंग हा उदेपुरास होता. परंतु, भैंदर किल्ल्यावर त्याचा मुलगा सालिमसिंग[4] होता, त्यानें संग्रामसिंगाला आडवें

---

१. अर्जुनसिंग हा, ज्या अजितसिंगानें मेवाडचा इंग्रजांशीं तह होण्याचा मुख्य योग आणिला त्याचा भाऊ होता.

२. प्रतापसिंग हा, चोंडावतांची जगावत ह्मणून एक शाखा होती तिचा मुख्य होता. तो पुढें मराठ्यांशीं लढत असतां मारला गेला.

३. लव्हा हें स्थल अद्यापि संग्रामसिंगाचे वंशजांकडेच आहे. संग्रामसिंगानें आपल्या सुक्तावत ठाकुराकरितां जें शौर्य आणि मर्दुमकी गाजविली त्याबद्दल सुक्तावत ठाकुराकडून तो गांव त्याला बक्षीस मिळाला. व पुढें, सन १८१७ त इंग्रजांशीं तह होऊन ज्या कित्येक घालमेली झाल्या, त्या वेळींही, संग्रामसिंगाच्या शौर्यवीर्याच्या गोष्टी ऐकून इंग्रजसरकारानें तो गांव त्याचे वंशजांकडे तसाच कायम राखिला.

४. सालिमसिंगाला रावत जवानसिंग ह्मणून एक मुलगा होता, व तो, हा मूळ ग्रंथकर्ता कर्नेल

होऊन, भैंदर किल्ल्याचे रक्षणासाठीं लढाई चालविली. त्या लढाईमध्यें संग्रामसिंगाच्या भाल्यानें सालिमसिंग मारला गेला. हें पुत्रवधाचें वृत्त उदेपुरास अर्जुनसिंगाला कळलें, तेव्हां तो फार क्रोधाविष्ट झाला; आणि त्या रागाच्या आवेशांत त्यानें आपल्या डोक्यावरचें पागोटें जमिनीवर फेंकून देऊन, अशी प्रतिज्ञा केली कीं, 'माझ्या पुत्रवधाचा सूड उगविल्याशिवाय मी पुनः डोकीवर पगडी चढविणार नाहीं !' नंतर त्यानें खुद्द आपल्या लोकांनाही फसवून, तो कोरावडाकडे जातो असें दाखवून, पट्कर शिवगडाकडे वळला. शिवगडावर संग्रामसिंगाचा बाप आणि इतर कुटुंबीय माणसें सुरक्षित स्थलीं ह्मणून ठेविलीं होतीं. शिवगड हा किल्ला, छप्पन नांवाच्या भागांत भोंवतालीं डोंगरी मुलूख आणि भयंकर अरण्य अशा ठिकाणीं आहे. आणि, तेणेंकरून त्या किल्ल्याला शत्रुभय मुळींच असण्याचा संभव नसल्यामुळें, संग्रामसिंगानें आपल्या कुटुंबांतील माणसांस तें निर्भय स्थल योजून दिलें होतें. त्याचे कुटुंबांत बायका आणि मुलेंही पुष्कळ होतीं. अर्जुनसिंगानें, अशा निर्भय स्थलीं आपल्या पुत्राचा घात करणाऱ्या संग्रामाची कुटुंबीय मंडळी आहे असें समजून, त्या किल्ल्यावरच हल्ला केला. संग्रामसिंगाच्या बापाचें नांव लालजी असें असून, त्याचे वयास ७० वर वर्षें झाल्यामुळें तो अगदीं ह्मातारा झाला होता व त्याचा एकही केश काळा राहिला नव्हता. किल्ल्याचे रक्षणास असावी तशी फौज वगैरे नव्हती. तथापि, त्या ह्मातार्‍यानें, मोठ्या नेटानें बराच वेळ युद्ध करून, आपल्या कुटुंबाचें रक्षण केलें. परंतु शेवटीं तो ह्मातारा लालजी धारातीर्थीं पडून मरण पावला ! ही खबर संग्रामसिंगाला मुळींच कळली नव्हती. लालजी मेल्यावर त्याची विधवा[1] ह्मणजे संग्रामसिंगाची आई, ही आपल्या पतीबरोबर सती गेली. तेव्हां, संग्रामाच्या मनुष्यांचा संभाळ करण्यास कोणीच न उरून, तीं सर्व मनुष्यें अर्जुनसिंगाचे हातीं सांपडलीं. तेव्हां त्यानें निर्दयपणें त्यांतील बालकांची तर कत्तलच केली ! अर्जुनसिंगाच्या ह्या दुष्ट कृत्यामुळें चोंडावत

---

टॉड् हा उदेपुरास असतांना, तेथें लष्करी प्रधान होता. उदेपूरच्या लष्करी प्रधानाची जागा, ह्या रावत जवानसिंगाचे पूर्वी, त्याचा चुलतआजा आणि चोंडावतपक्षाचा मुख्य चालक जो अजितसिंग त्याचेकडे होती. कर्नल टॉड् याचे वेळीं चोंडावतांचे मुख्य सरदाराचा वंशज पद्मसिंग ह्या नांवाचा असून, तो नुक्ताच वयांत आला होता. 'उदेपूरच्या ह्या सरदारांचे गेल्या अर्धशतकापासून चालू असलेले आपसांतले वाद आणि तंटे मिटून, त्यांनीं आपल्या गादीचा अभिमान बाळगण्याविषयीं आणि एकमेकांस एकमेकांचा उपयोग होऊं देण्याविषयीं,' टॉड् ह्मणतो, 'मीं, इंग्रजांचा वकील ह्मणून, पुष्कळ मेहनतीनें आणि माझें कर्तव्य ह्मणून मध्यस्थी केली.'

१. ही बाई सूक्तावतपक्षीय रजपुतांतला मानसिंग ह्मणून जो प्रसिद्ध सरदार होता त्याची आजी होय. तेव्हां, नातवामध्येंही आजीचें धैर्य, गांभीर्य आणि एकनिष्ठा हीं ठसलीं होतीं, असें दिसतें.

आणि सुक्तावत या उभय पक्षांतील वैमनस्य फारच विकोप्याला पोंचलें. त्यांत राणा अल्पवयी; आणि प्रतिवर्षी मराठ्यांची स्वारी व देशांत लुटालुट; ह्यामुळें मेवाड देश अधिकाधिकच खराबीस येऊन पोहोंचूं लागला. देशांत अस्वस्थता माजल्यामुळें, शेतीभाती, कारागिरी, उद्योगधंदे आणि व्यापारव्यवसाय हीं लोकांस सुचेनाशीं होऊन, ते लोक भराभर उदेपूर सोडून जाऊं लागले. असें ह्मणतात कीं, अशा अस्वस्थतेनें उदेपूरची वस्ती अर्धी झाली !

चोंडावतांचा भीमसिंग ह्मणून एक मुख्य सरदार होता. तो अत्यंत गर्विष्ठ असल्यामुळें त्यानें राण्यास मानूं नये इतकेंच नाहीं; तर तो राज्यकारभार पाहणाऱ्या राजमातेचाही अपमान करीत असे, त्यानें आपल्या मुखत्यारीनें सिंधी लोकांस चितोडापासून उदेपुरापर्यंतच्या बहुतेक सर्व जमिनी वांटून टाकल्या. पुढें अशी गोष्ट झाली कीं, खुद्द राण्याचें ईदर येथें लग्न झालें. परंतु, त्या लग्नाला राण्याचेजवळ पैसा नव्हता; ह्मणून त्याला कर्ज काढावें लागलें. आणि पुढें लागलेंच भीमसिंगाच्या मुलीचें लग्न झालें; तेव्हां त्यानें त्या लग्नाप्रीत्यर्थ १० लाख रुपये खर्च केले. चोंडावतांच्या अशा कपटाचरणानें राणीला फारच राग येऊन, तिनें, त्यांचेपासून आपला बिलकुल फायदा नाहीं, व वेळेवर ते लोक आपल्या कांहीं एक उपयोगाचे नाहींत असें पाहून, त्यांचा पक्ष सोडून देऊन, ती सुक्तावतांच्या पक्षास मिळाली. आणि तिनें आपल्या राज्यांतले मुख्याधिकार भैंदर आणि लव्हा येथील ठाकुरांकडे सुपूर्त केले. ह्या ठाकुरांकडे जरी राणीनें मोठमोठे अधिकार दिले तरी त्यांच्यामध्यें हें सामर्थ्य नव्हतें कीं, त्यांच्यानें राणीच्या विरुद्ध असणाऱ्या लोकांवर दाब बसेल. आणि, ह्मणून, ते आणखी आपल्या साह्यासाठीं बाहेर कोणाची मदत बघूं लागले. त्यांनीं कोट्याचा झालिमसिंग याची मदत घेतली. झालिमसिंग याचा चोंडावतांशीं द्वेष असून, त्याचें सुक्तावताच्या कन्येशीं लग्न झालें असल्यामुळें, त्याचा सर्व पक्ष सुक्तावतांचे बाजूलाच होता. तेव्हां चोंडावतांचे विरुद्ध साह्य देण्यास तो ताबडतोब राजी झाला. झालिमसिंगाचा आणि मराठ्यांचा फार स्नेह होता. तेव्हां तो नानाजी बल्लाळ यांचें साह्य घेऊन, १०००० लोकांसहवर्तमान सुक्तावतांकडे जाऊन मिळाला. सुक्तावतांचा विचार, चितोडचा जुना किल्ला जो साळुंब्र्याच्या ठाकुराकडे होता तो घेऊन, तेथून त्यास हुसकून द्यावें, असा होता. त्या किल्ल्याचे संरक्षणार्थ सिंधी लष्कर होतें व त्या लष्करांतले लोक साळुंब्र्याच्या ठाकुरास मानीनातसेही झाले होते. आणि, तो ठाकूर तर गर्वानें फुगून आपल्या लहानशा राजास मानीनासा झाल्यामुळें त्याचे विरुद्ध लोकांचा कट होण्यास अवकाशींच लागलाच नाही.

इकडे, जोधपूर (मारवाड) आणि जयपूर येथील राजे एकत्र होऊन त्यांनीं महादजी शिंद्यावर स्वारी केली. ही रजपुतांची आणि मराठ्यांची लढाई लालसोट येथें झाली; व तींत महादजीचा पूर्णपणें पराभव होऊन, रजपुतांनीं आपला मुलूख मराठ्यांपासून सर्व परत घेतला. ह्यावेळीं राण्यानेंही आपला मुलूख मराठ्यांपासून परत घेण्यास हयगय केली नाहीं. ह्याप्रमाणें; ही वेळ ह्मणजे रजपुतांचें गेलेलें पूर्ववैभव फिरून परत मिळविण्याचीच जणूं काय आली असून, त्यांनीं, त्याप्रमाणें, मराठ्यांनीं घेतलेले आपले मुलूख सर्व परत मिळविले; यामुळें, त्यांचें शौर्य व तेज पुनः जागृत झाल्यासारखें झालें. उदेपुरास मालदास मेहेता हा मुख्य दिवाण नेमिला असून, त्याचे हाताखालीं मौजीराम या नांवाचा नायब दिवाण होता. हे दोघेही बुद्धिमान् आणि करारीचे होते. त्यांनीं निंबहेरा महाल खालसा केला; आणि तेथें जी मराठ्यांची लहानशी फौज होती तिला हुसकून देऊन, तिच्या ताब्यांत जावद हें शहर होतें तेंही घेतलें. निंबहेरा येथें मराठ्यांच्या वतीनें शिवाजी नाना या नांवाचा सुभेदार होता; तो तर राण्याला शरण गेला. तेव्हां त्याला तसेंच सोडून दिलें. तिकडून मेघावर्त रजपूत उठून त्यांनींही मराठ्यांना घालवून देऊन, त्यांजपासून बेगू, सिंगोली, वगैरे प्रांत आणि दुसरा सुपीक व श्रीमंत मुलूख काबीज केला. तसेंच, चोंडावत यांनींही आपलें रामपुरा हें जुनें शहर आणि जाहगिरीचा प्रांत मराठ्यांपासून घेऊन, तेथून त्यांस घालवून दिलें. येणेंप्रमाणें, कांहीं वेळपर्यंत रजपुतांनीं आपलें पूर्ववैभव आणि आपला पूर्वीचा अंमल हीं बहुतेक फिरून मिळविलीं.[१] रजपुतांना जो हा विजय मिळत चालला तेणेंकरून त्यांना जास्त जास्त आशा सुटून ते जास्त जास्त मुलूख आपल्या ताब्यांत घेण्याचे इच्छेनें पुढें पुढें जाऊं लागले. त्यांनीं आपल्या परत मिळविलेल्या मुलखाचे सुव्यवस्थेकडे आणि मजबुतीकडे विशेष लक्ष द्यावयाचें; परंतु तसें न करितां, ते त्या जयाचे धुंदींत पुढें रेंटीत जाऊं लागले. त्यांनीं, मेवाड आणि माळवा यांचे सरहद्दीवर रिंकिया नांवाची एक लहानशी नदी आहे, त्या नदीचे कांठीं चट्टू ह्मणून एक गांव होतें त्या गांवापर्यंत चाल केली. ह्यावेळीं त्यांनीं मराठ्यांशीं केलेल्या तहनाम्यामध्यें आणखी कांहीं कलमें घालून, त्यांना आपल्या ह्मणण्याप्रमाणें अधिक पक्कें बांधून घेतलें असतें तर ती गोष्ट सहज होण्यासारखी होती. युक्तीनें त्यांचा हात गुंतविण्यापेक्षां त्यांस चेतविण्यासाठीं त्यांच्या मुलखांत जाऊन

---

१. बेगूचा ठाकूर मेघसिंग ह्मणून होता, व तो चोंडावत रजपुतांच्या एका शाखेचा मुख्य होता. त्यावरून त्या शाखेला त्याचेंच नांव पडलें. मेघसिंग याचा वर्ण अगदीं काळा असल्यामुळें त्याला 'काळा मेघ' किंवा 'काळा ढग' असें ह्मणत असत. व त्याचे पुढें त्याचे शाखेस 'मेघावत' ह्मणूं लागले. मेघसिंग याचे वंशज पुष्कळ झाले व ते सर्व वस्ताद आणि फार दांडगे होते.

धिंगामस्ती करण्याचें कांहीं एक कारण नव्हतें. परंतु रजपुतांकडून ह्या प्रकारची सावध-गिरी झाली नाहीं, ही गोष्ट चांगली झाली नाहीं. ते निंबहेराशहरावर चालून गेले. निंबहेरा हें शहर होळकराच्या ताब्यांतलें असून, त्यावेळीं होळकराची विधवा राणी अहिल्याबाई ही आपल्या संस्थानचा सर्व कारभार पहात असे. रजपूतलोक, ह्याप्र-माणें, मऊ सांपडलें तसे कोंपरानें खणूं लागले, असें पाहून ती बाई संतापून गेली. आणि, तिनें रजपुतांस आपला कसा काय पराक्रम आहे तो दाखविण्याचा निश्चय केला. तिच्या मसलतीला शिंदाही अनुकूल झाला. शिवाजी नाना याचा पराभव करून, त्यास रजपुतांनीं घालवून दिल्याबद्दलची हकीकत वर आली आहेच. त्या शिवाजी नानाला अहिल्याबाईनें मदत देऊन, त्यास रजपुतांवर चालून जाण्यास आणि आपला सूड उगविण्यास उत्तेजन दिलें. तुळाजीराव शिंदे आणि श्रीभाई हे दोघे मराठे सरदार ५००० घोडेस्वारांसहवर्तमान शिवाजी नाना याचे मदतीसाठीं निघाले. शिवाजी नाना हा मंदोसरास येऊन राहिला होता. शिवाजी नाना यास रजपुतांनीं सोडून दिल्यावर, त्यांनीं त्याला आपल्या तहांत जितकें बांधून घ्यावयास पाहिजे होतें तितकें बांधून घेतलें नसल्यामुळें, शिवाजी नाना हा मंदोसरास आपली फौज वगैरे घेऊनच राहिला होता. आणि, त्याला वर लिहिल्याप्रमाणें, अहिल्याबाई होळकरणीकडून मदत गेल्यावर तर तो रजपुतांना भारी होण्याचा संभव साहजिकच होता. रजपुतांच्या फौजेची आणि मराठ्यांच्या फौजेची गांठ, माघ शु० ४, मंगळ-वार, वि० सं० १८४४ (इ० स० १७८८) रोजीं पडून, लढाई झाली. शिवाजी नानाची इतकी तयारी असेल, असें राण्याचे फौजेस वाटलें नव्हतें. ह्या लढाईत राण्याचा मुख्य प्रधान मालदास मेहेता हा ठार झाला. त्याचप्रमाणें, कानोर व सादी येथील ठाकूर आणि इतर बहुत लोक जखमी झाले. त्यांत सादीच्या ठाकुरास[1] तर मराठ्यांनीं आपल्याकडे कैद करूनच नेलें. येणेंप्रमाणें, रजपुतांनीं जो नुक्ताच विजय संपादून आपलें पूर्ववैभव आणि पूर्वाधिकार आपल्या ताब्यांत आणिले होते तो सर्व जयाचा भाग पुनः नाहींसा होऊन, मात्क्यान् एक रजपुतांचा विनाशकाळ डोकावूं लागल्याचें दिसूं लागलें ! मराठ्यांनीं रजपुतांकडे आपला गेलेला मुलूख पुनः मिळविला. मात्र जावद महाल त्यांना मिळाला नाहीं. जावदच्या किल्ल्यावर दीपचंद नांवाचा रज-पुतांचा एक सरदार संरक्षणार्थ होता. त्यानें मराठ्यांशीं एक महिनापर्यंत सतत लढाई करून किल्ल्याचें रक्षण केलें. आणि तेथून विजय संपादून, तो मराठ्यांच्या फौजेला दाद न देतां, तसाच मंडलगडास आला.

---

१. हा ठाकूर पुढें दोन वर्षेंपर्यंत मराठ्यांच्या कैदेंत होता. शेवटीं त्यानें आपल्या संस्थानांतलीं उत्तम अशीं चार शहरें मराठ्यांना दिलीं, तेव्हां त्याची सुटका झाली.

परंतु अशा किरकोळ जयसंपादनानें आणि शौर्यदर्शनानें रजपुतांचे कायमचे हक्क आणि सुरक्षितता राहण्याचा संभव नव्हताच. बहुतेक रजपूत या वेळीं देशाभिमानपूर्वक एकजीव झाले होते. परंतु चोंडावतांचें जें राण्याचे घराण्याशीं आणि राण्याचे पक्षाशीं वितुष्ट होतें तें संपलें नव्हतें. राण्याची आई ह्मणजे राज्याचा कारभार पाहणारी व तिचा नवीन दिवाण सोमजी यांचें आणि चोंडावतांचें मुख्य वैर होतें. चोंडावत हे राणीला आणि तिच्या दिवाणाला बिलकुल मानीत नव्हते. पुढें, राणीनें, सालुंब्र्याच्या ठाकुराकडे आपली आवडती दासी रामप्यारी इजला पाठवून, उदेपुरचे गादीच्या निर्भय व्यवस्थेविषयींचें बोलणें चालविलें. तेव्हां सालुंब्रावाल्यानें रामप्यारीबरोबर राणीकडे अभिवचनपूर्वक निरोप पाठविला कीं, 'मी प्रत्यक्षच उदेपुरास येऊन आपली भेट घेईन; व नंतर जें काय ठरवावयाचें असेल तें आपल्या सर्वांचे विचारें ठरवूं.' त्याप्रमाणें पुढें सालुंब्र्याचा ठाकूर उदेपुरास आला. त्यानें राणीची भेट घेतली; आणि तिला सांगितलें कीं, 'आतां आपल्या ह्मणण्याप्रमाणें दिवाणजींचें काय ह्मणणें आहे तें त्यांस स्वतंत्रपणें भेटून विचारतों; ह्मणजे त्याप्रमाणें पुढें सर्व व्यवस्था करावयास बरें पडेल.' सालुंब्रावाल्यानें राणीला ह्याप्रमाणें गोडगोड बातांनीं बरीच आशा लावून ठेविली. परंतु त्यानें दिवाणजींची स्वतंत्रपणें भेट घेण्याबद्दल जे राणीला सांगितलें, त्या सांगण्यांत त्याचें कपट होतें; व त्याप्रमाणें दिवाणजींची भेट घेऊन, त्या भेटीमध्यें आपला द्वेष आणि सूड उगविण्याचा त्याचा बेत होता; हें पुढील हकीकतीवरून सहज कळून येईल. एके दिवशीं, दिवाण सोमजी हा आपल्या दिवाणखान्यांत बसला असतां, कोरावड येथील सरदार अर्जुनसिंग आणि भदेश्वरचा सरदारसिंग असे दोघे सरदार तेथें आले. आणि, तेथें आल्याबरोबर सरदारसिंगानें त्याला विचारिलें कीं, 'तुह्मीं आमची जाहगीर काय ह्मणून जप्त केली?' त्याच्या ह्या प्रश्नावर दिवाण सोमजी याजकडून उत्तर निघतें आहे तोंच सरदारसिंगाची कट्यार त्याचे पोटांत घुसली; आणि तेथल्या तेथेंच तो बिचारा मरून पडला! ही गोष्ट घडली तेव्हां राणा हा उदेपुरांत नव्हता. तो 'सेहेलिया बारी' नांवाच्या एका खिंडीमध्यें हवा खाण्यासाठी जाऊन राहिला होता. त्याचे बरोबर बेदनूरचा

---

१. टॉड् ह्मणतो, 'सरदारसिंग हा, माझ्या वेळीं जीवंत असलेला हम्मीरसिंग याचा बाप होता. बापाप्रमाणेंच हम्मीरसिंग हा दांडगा, धटिंगण आणि बेमुर्वतीचा असल्यामुळें, राजस्थानांतल्या इतर ठाकुरांपेक्षां त्याजशीं मला विशेष कडकपणाने वागावें लागे. परंतु, माझ्या कडकपणाची त्याला दहशतच वाटत नसे. तो अतिशय छांदस व छळवादी असल्यामुळें त्याचेपासून मोठा त्रास होई. त्याचे फळे तांबडेलाल असल्यामुळें त्याला राजस्थानांत 'भदेश्वरची तांबडी नदी' या नांवानेंच सर्व लोक ओळखतात! त्याचेविषयीं मला दिवसेंदिवस जास्त जास्त अनुभव येत गेला.'

२. 'सहेलिया बारी' याचा अर्थ 'वनदेवतांची बाग' असा आहे.

जैतसिंग ठाकूर होता. राण्याकडे दिवाणाचे दोघे धाकटे भाऊ एकाएकीं जाऊन, त्यांनीं आपल्या वडील बंधूचा वध करण्याऱ्या दुष्टांपासून आपलें संरक्षण करण्याविषयीं राण्याची प्रार्थना केली. त्यांचे मागोमाग कोरावडचा अर्जुनसिंगही राण्याकडे आला. त्यावेळीं, दिवाण सोमजी याचा नुक्ताच वध केल्यामुळें त्याच्या हातांना सोमजीचें रक्त तसेंच लागलेलें होतें; आणि अशा स्थितींतच तो आपल्या राण्याचे पुढें हजर झाला. इतका तो निर्लज्ज होता ह्मणावा किंवा असा तो धारिष्टाचा होता असें ह्मणावें! परंतु, अर्जुनसिंगाच्या त्या अघोर कृत्याबद्दल त्याला शासन करण्याचें सामर्थ्य राण्यामध्यें बिलकुल नसल्यामुळें, राण्याच्यानें अर्जुनसिंगाचें कांहींएक पारिपत्य करवलें नाहीं. फक्त, अर्जुनसिंग राण्याचे पुढें जसा हजर झाला तसा राण्यानें त्याचा अतिशय निषेध करून, त्याला इतकें मात्र ह्मटलें कीं, 'तूं अतिनीच आणि विश्वासघातकी पुरुष आहेस! तूं माझे पुढें आपलें काळें तोंड घेऊन उभा राहूं नकोस!' ह्यापेक्षां राण्याकडून कांहीं एक झालें नाहीं; व ह्यापेक्षां त्याजकडून जास्त होण्यासारखें कांहीं नव्हतेंही. ह्याप्रमाणें, अतिदुष्टपणाचें कृत्य करून, अर्जुनसिंग साळुंब्र्याचा ठाकूर व त्यांचे अनुयायी चोंडावत असे चितोडास दाखल झाले. मयत दिवाण सोमजी याचे वर सांगितलेले, ह्मणजे राण्याकडे बापाचे वधाबद्दलची फिर्याद घेऊन गेलेले दोघे मुलगे—शिवदास आणि सतीदास—यांस राण्यानें त्यांचे बापाच्याच जागीं नेमून, त्यांजकडे उदेपूरच्या राज्याची सर्व व्यवस्था सुपूर्त केली होती. ह्या उभय बंधूंनीं सुक्तावतांचे मदतीनें, राण्याचे विरुद्ध बंडावा आणि दंगेधोपे करणारे जे चोंडावत यांचेबरोबर ब्ऱ्याच लढाया मारल्या. त्यांत अकोला नांवाच्या ठिकाणीं तर त्यांस बंडखोरांवर चांगला जय मिळाला. त्यावेळीं बंडखोरांचें सैनापत्य कोरावडच्या अर्जुनसिंगाकडेच होतें. अकोल्यास सुक्तावतपक्षास जय मिळाला खरा; परंतु, तिकडे खैरोद येथें जी सुक्तावतांची आणि चोंडावतांची झुंज लागली होती तिजमध्यें सुक्तावतांचा अगदीं परा-

---

१. ह्या दोन भावांचीं नांवें शिवदास आणि सतीदास अशीं होतीं. हे दोघे बंधु जेव्हां राण्याकडे फिर्याद घेऊन गेले तेव्हां त्यांचेबरोबर त्यांचा चुलतभाऊ जयचंद या नांवाचा एक गृहस्थ होता. ह्या दोघां भावांनीं, पुढें, आपल्या वडील भावाच्या घात करणाऱ्या सरदारसिंगाचा वध केला; परंतु त्या वधामुळें आणखी तेही मारले गेले. सरदारसिंग हा चोंडावत पक्षाचा होता. परंतु, टॉड् ह्मणतो, 'माझ्या वेळीं जो त्याचा मुलगा भदेश्वरची जाहगीर उपभोगीत होता तो हम्मीरसिंग, आपल्याला सुक्तावत पक्षांतला समजतो. आणि, खरें पाहिलें असतां, चोंडावतांपेक्षां सुक्तावतांचे कुळांत थोरपणा व विचारीपणा पुष्कळ असलेला दिसतो. आणि, यामुळेंच, हम्मीरसिंगाला आपल्याला सुक्तावतपक्षाचा ह्मणवून घेण्यांत मोठा अभिमान वाटे,' असें टॉड् ह्मणतो. 'हम्मीरसिंगाला, त्याचा बाप सरदारसिंग यानें उदेपूरचा दिवाण सोमजी याचा विश्वासघातानें वध केला याचें स्मरण दिलें ह्मणजे, त्यास वाईट वाटून लज्जा वाटे,' असें टॉड् सांगतो.

भव झाला. अशा प्रकारें रजपुतांच्या आपसाआपसांतच लढाया माजल्या. त्यांत कधीं सुक्तावत जयी होत व कधीं चोंडावतपक्षाची सरशी होई. परंतु ह्या आपसांतल्या तंट्यांनीं आणि भांडाभांडींनीं मेवाडदेशाची मात्र दिवसेंदिवस जास्त जास्त दुर्दशा होत चालली. देशामध्यें तंटे, भांडाभांडी आणि लढाया व युद्धें हीं चालू राहिल्यानें कोणाला सुखशांति मिळत नाहींसारखी होते. आतां आह्मी लिहितों त्या वेळची मेवाडची स्थिति बघितली तर अशीच अस्वस्थतेची झाली होती. शेतीभाती, व्यापार, दळणवळण वगैरे सर्व व्यवहार केवळ बंद पडल्यासारखे झाले होते. शेतकऱ्यांनीं आपलीं शेतें पडीत टाकून देऊन, देशाला नापीकपणा आणिला होता. त्यांनीं तरी बिचाऱ्यांनीं करावें काय ? शेतांत पेरलेलें धान्य निर्वेधपणें आपल्या हातीं लागेल, आणि आपल्या श्रमांचें फळ आपल्याला मिळेलच, अशी मुळींच कोणाची खात्री नसल्यामुळें, शेतीचें नांव तरी कशाला विचारायाला पाहिजे होतें ? लोक हळू हळू आपला देश सोडून देऊन, जेथें शांति व स्वस्थता मिळेल तिकडे मुलेंमाणसें घेऊन जाऊं लागले होते. व्यापाराची आणि क्रयविक्रयाची हीच दशा झाली. थोड्याच वर्षांत मेवाडची लोकसंख्या अर्ध्यापेक्षां अधिक कमी झाली. जिकडे तिकडे जमिनी ओसाड पडलेल्या दिसूं लागल्या; आणि तेथल्या अनेक प्रकारच्या खाणी उघड्या पडून मेवाडांतील सर्व प्रकारचे कारखाने, कलाकुसरीचीं कामें आणि कापड विणण्याचे वगैरे माग अगदीं बंद पडून, उद्योगव्यवसाय देशांतून हद्दपार झाल्यासारखे झाले. राण्याजवळ पैसा नसल्यामुळें तो दरिद्रानें ग्रस्त झाला. राजा ह्मणून त्याजकडून प्रजेचें रक्षण व्हावयाचें; तों त्यालाच प्रजेकडून रक्षण मिळविण्याचा प्रसंग आला. राजा आणि प्रजा यांचेमध्यें जें एक स्वाभाविक बंधन असतें तें बंधन सर्वच तुटलें जाऊन, प्रत्येक मनुष्याला किंवा समाजाला आपलें रक्षण आपणच केलें पाहिजे, असा प्रसंग प्राप्त झाला. ह्या स्थितीमुळें पुढें मेवाडदेशामध्यें अनेक संकटें उद्भवलीं. लोकांना राजरक्षण तर पाहिजे ? परंतु तें कोठून आणि कसें मिळावें ? ही पंचाईत पडून, शेतकरी व शिलेदार यांनीं कोणत्या तरी सरदाराचा आश्रय करून, त्याच्या रक्षणाखालीं रहावें व त्यालाच आपला धनी समजून, त्याजकडेच आपल्या रक्षणाबद्दलचें सरकारदेणें द्यावें. ह्यामुळें, त्यावेळीं प्रत्येक सरदार ह्मणजे एक छोटासा राजाच झाल्यासारखा झाला होता. सर्व देश ह्या सरदारांमध्यें विभागला जाऊन, ज्याला जितका प्रदेश आपल्या ताब्यांत राखतां आला तितका तो संभाळून स्वतंत्रपणें राहूं लागला. यामुळें देशाचें फार नुकसान झालें. सर्व सरदार वेगवेगळे आणि स्वतंत्र झाल्यामुळें मुख्य सरकार (राणा) पंगू व अशक्त झालें. आणि व्यापारव्यवहाराला तर फारच मोठा धक्का बसला. व्यापाऱ्यांच्या प्रत्येक उंटामागें प्रत्येक सरदाराचे हद्दीवर दस्तुरी व

कर बसल्यामुळें व्यापाराचें स्वातंत्र्य आणि त्याची भरभराट अर्थात् बंदच पडली. ह्याप्रमाणें, मेवाडदेशाचा ऱ्हासकाळ सर्व बाजूंनीं डोकावून आंत आपला प्रवेश करीत होता. आणि अशामध्येंच मराठ्यांनीं आपला लुटालुटीचा क्रम अप्रतिबद्ध चालू ठेवावा. ह्मणजे, मग त्या देशाचा काय परिणाम झाला असेल, ह्याचें वर्णन करण्यापेक्षां त्याविषयीं अनुमान करून मेवाडची दुःस्थिति वाचकांस सहज समजण्यासारखी आहे. कालाची गति अशीच कांहीं विचित्र आहे !

चोंडावतपक्षाचें बंड आपल्याच्यानें मोडवत नाहीं असें पाहून, राणा आणि त्याचे मंत्री यांनीं असा विचार केला कीं, शिंद्याला बोलावून आणून त्याचे मदतीनें हें आपल्या जुन्या राजधानीचे शहरावरील वादळ दूर करावें. शिंद्याला बोलावून आणण्याची मसलत प्रथमतः झालिमसिंग यानें काढिली. ह्या वेळीं झालिमसिंग हा कोट्यास राजप्रतिनिधि ह्मणून तेथील राज्यकारभार बघत होता. राण्यानें झालिमसिंग व आपला दिवाण ह्या दोघांस शिंद्याकडे आपल्याला साह्य करण्याविषयींचें बोलणें लावण्यासाठीं ह्मणून पाठविलें (वि० सं० १८४७ ह्मणजे इ० स० १७९१). ह्या वेळीं शिंदा हा पुष्करतीर्थी यात्रार्थ गेला होता, व तेथेंच कांहीं दिवस तीर्थवास करून होता. लालसोट येथें जयपूर व जोधपूर येथील राजांनीं शिंद्याचा पराजय केल्यानंतर शिंद्यानें त्या आवेशावर डि-बोइन नांवाच्या पोर्च्युगीज् (फरॉसिस्) सरदाराकडून आपल्या पलटणींस कवाईत शिकवून लष्कर तयार केलें.[1] ह्या तयारीनें, शिंद्याला जें पूर्वी अपयश आलें होतें तें सर्व भरून आलें. मेरट व पाटण येथें शूर राठोडांबरोबर त्याची लढाई झाली. त्या लढाईत राठोडांनीं आपलें पुष्कळ

१. राघोबादादा फितूर होऊन, इंग्रजांस मिळाला; व पुढें इंग्रजांची आणि मराठ्यांची तळेगांवीं लढाई झाली. त्या लढाईत इंग्रजांचा मराठ्यांनीं पूर्णपणें पराभव करून, राघोबादादास आपलेकडे परत आणिलें, ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. ह्या लढाईत महादजी शिंदे उर्फ पाटीलबोवाही होते. तळेगांवीं लढाईत जय मिळवून शिंदे परत आल्यावर त्यांनीं नानाफडणविसांस विचारिलें कीं, 'या लढाईत आपण काय शिकलां ?' परंतु, नानांस त्या प्रश्नाचें मर्म न उमजल्यामुळें, ते ह्मणाले, 'या लढाईत शिकावयाचें तें काय होतें ?' तेव्हां, महादजींनीं सांगितलें कीं, 'आपल्या पन्नास हजार फौजेला इंग्रजांच्या पांच हजार फौजेनें एक महिनाभर जुमानलें नाहीं हें कसें ? याचें तत्व एवढेंच कीं, इंग्रजांची फौज कवाइती असल्यामुळें तिची शक्ति आपल्या फौजेच्या दसपट अधिक अनुभवास येते. फौजेला कवाइतीचें शिक्षण हें अवश्य आहे. आणि, ह्यासाठीं मीही आतां माझ्या फौजेस कवाईत शिकवून पलटणी तयार करतों.' शिंद्यांनीं असें ह्मणून पुढें हिंदुस्थानांत जाऊन वर लिहिल्याप्रमाणें डि-बोइन, जॉन बत्तीस, बेकव, शिकंदर, वगैरे युरोपियन सरदार आपल्या पदरीं ठेवून त्यांजकडून पन्नास हजार फौजेच्या कवाइती पलटणी तयार करविल्या. या कवाइती फौजेनें पुढें कसकसा पराक्रम गाजविला तें इतिहासप्रसिद्ध आहेच. शिंद्याच्या फौजेपुढें रजपुतांचें व मुसलमानांचें कांहीं एक चाललें नाहीं !

शौर्य दाखविलें. परंतु, त्यांच्या शौर्याचें तेज व उपयोगीपण शिंद्याच्या कवाइती फौजेपुढें बिलकुल दिसलें नाहीं. पुढें, राण्याकडूनही त्याला साह्याचें आमंत्रण आल्यामुळें, आतां आपलें गेलेलें नांव राजस्थानांत पुनः मिळविण्याची ही योग्य संधि दवडतां उपयोगीं नाहीं, असा विचार करून, शिंद्यानें राण्याला मदत देण्याचें अभिवचन, त्याजकडे गेलेल्या सरदारांचे हातावर दिलें. ह्याप्रमाणें, राजकीय प्रकरणांत पुनः विलक्षण प्रकारची ढवळाढवळ होऊन, त्यामध्यें जसे ज्यांचे स्वभाव होते तशा त्यांच्या वर्तणुकी दिसूं लागल्या. हें पुढील हकीकतीवरून सर्व कळून येईल.

झालिमसिंग हा कोट्यास राजप्रतिनिधि, ह्मणजे अज्ञान राजा असल्यामुळें त्याचा सर्व कारभार करणारा, झाला होता. त्याजकडे सर्व अधिकार पूर्णपणें होते. त्यानें त्या राज्यांत आपलें असें वजन बसविलें कीं, त्याचे भोंवतालच्या शत्रूंकडून त्यास सन्मान मिळूं लागला. त्यानें आपला इतका अम्मल बसविणें तरी लहान सामर्थ्याचें काम नव्हतेंच, व त्याच्या त्या गुणांप्रमाणें त्याची कीर्तिही झाली. परंतु, त्याची महत्वाकांक्षा यापेक्षां फार मोठी असल्यामुळें, त्या महत्वाकांक्षेला कोटासंस्थानचीच हद्द पुरीशी न होऊन, ती फार दूरवर जाण्याचा यत्न करूं लागली. झालिमसिंगाला आपला अम्मल वाढवून हळू हळू मेवाडदेशांत कायमची सत्ता बळकावण्याची विशेष इच्छा होती; व हा आपला हेतु त्यानें फार गुप्त ठेविला होता. झालिम हा मोठा धूर्त असून, आपल्या प्रयत्नांस कोणकोणाकडून अडथळे येतील किंवा कोण कोण अशक्त असल्यामुळें आपल्यास हरकती न आणतां, आपले प्रयत्न सफल होऊं देतील, हें त्यास पूर्णपणें कळत होतें. राणा भीमसिंग याच्या आजपर्यंतच्या वर्तनावरून त्याची अशी पक्की खात्री झाली होती कीं, आपण पुढें मेवाडांत पाऊल टाकलें तर त्याजकडून कोणत्याही प्रकारें आपल्याला अडथळा होण्याचा संभव नाहीं, तथापि, त्याला युक्तीनें व बाह्यात्कारीं हित दाखवून, आपला हेतु साधला पाहिजे; असा त्यानें विचार केला. त्यानें राणा भीमसिंग यास असें सांगितलें कीं, 'हारौटीप्रांत (ह्मणजे, ज्यांत कोट्याचें राज्य होतें तो) आणि मेवाड हे दोन्ही भाग एकत्र करून, एकमतानें आणि एकमेकांच्या साह्यानें वागूं लागले तर उभयतांचेंही उत्तम प्रकारें संरक्षण होऊन, तें चांगलें जोरवान् राष्ट्र होईल; आणि सर्व राजस्थानांत ह्या जोड राष्ट्राचा चांगला वचक राहील.' राजस्थानांत मेवाडच्या बरोबरीचें दुसरें राज्य जयपूरचें होतें. परंतु त्याविषयीं तर झालिमसिंगाला मुळींच भीति नव्हती. कारण, त्यानें स्वतः कोट्याचीं पलटणें घेऊन, जयपूरच्या अशक्त फौजेचा अगदीं पराभव करून टाकला होता. आणि, त्यामुळें त्याचेबद्दलची भीति आणि दरारा त्या प्रांतांत व इतर ठिकाणीं बराच पसरला होता. त्याचप्रमाणें, मारवाडच्या इतर

संस्थानांवरही झालिमसिंगाचें चांगलें वजन असल्यामुळें, त्यांचेकडूनही कोणत्याही प्रकारची हरकत व अडथळा येण्याची त्यास बिलकुल धास्ती नव्हती. झालिमसिंगाचे हेतु तर फार मोठे होते व त्या हेतूंप्रमाणें त्याला सिद्धिही मिळण्याचा पूर्ण संभव होता. त्या संभवानुरूप त्याला यश मिळालें असतें, तर त्याच्या बुद्धिमत्वाचा प्रभाव हिंदुस्थानाला कळून, राजस्थानची हीन दशा खचित नाहींशी झाली असती. परंतु एका गोष्टीमुळें झालिमसिंगाचे सर्व हेतु ठिकाणच्या ठिकाणींच राहून, आणि हिंदुस्थानांत आपली विजयपताका फडकविण्याची त्याची महत्वाकांक्षा समूळ नाहींशी होऊन, राजपुतान्यांत त्याची दुष्कीर्ति आणि बदनामी मात्र झाली. हें पुढील खुलाशावरून कळून येईल.

वर सांगितल्याप्रमाणें, जेव्हां राण्यानें झालिमसिंगाला शिंद्याकडे मदतीचें बोलणें लावण्यासाठीं पाठविलें, तेव्हां झालिमसिंगानें आपल्या गुप्त हेतूंचा शिंद्याला संशय देखील येऊं दिला नाहीं. शिंद्याकडे येऊन जी बोलण्याचालण्याची खटपट आपण करीत आहों ती केवळ निरपेक्ष बुद्धीनें आणि राण्याच्याच वैभवरक्षणार्थ करीत असल्याचें त्यानें शिंद्यास भासविलें. तो ह्मणाला, 'राण्याचें मेवाडांतलें वजन वाढविण्यासाठीं, मुख्यत्वें, चोंडावतांकडे जो चितोडचा किल्ला गेला आहे तो अगोदर कसेंही करून मिळविला पाहिजे. आणि, ह्या लढाईबद्दलचा सर्व खर्च त्या बंडखोरांवर लादून, त्यांजपासून ६४ लाख रुपये काढले पाहिजेत.' त्यानें शिंद्याशीं अशीही कबूली केली कीं, 'हे ६४ लाख रुपये बंडखोरांकडून मिळाले ह्मणजे त्यांपैकीं तीन-पंचमांश तुह्माला देऊन, बाकीची रक्कम राण्याचे खजिन्यांत जमा करूं.' ह्याप्रमाणें, झालिमसिंगाचें व शिंद्याचें बोलणें होऊन, शिंद्याकडून झालिमसिंगाबरोबर अंबाजी इंगळे यास आपलीं शूर पलटणें देऊन पाठविण्यांत आलें. आणि शिंदा हा मारवाडांतून खंडणी वसूल करण्यासाठीं तिकडे गेला. झालिमसिंग हा अंबाजीसहवर्तमान चितोडावर गेला, आणि त्याणें बंडखोरांवर विजय मिळविला. ह्या विजयापूर्वीं चोंडावतपक्षाचा जो पुढारी सालुंब्र्याचा भीमसिंग ठाकूर त्याचा हम्मीरगड नांवाचा किल्लाही झालिमसिंगानें काबीज केला. ह्या किल्ल्यावर भीमसिंग ठाकुराचा मुख्य मंत्री धीरजसिंग या नांवाचा मोठा बुद्धिमान् व शूर सरदार होता; व त्यानें झालिमसिंगास दीड महिनापर्यंत मोठ्या शौर्यानें झुलवून किल्ल्याचें रक्षण केलें आणि याचप्रमाणें, पुढेंही त्यानें झालिमसिंगास दाद दिली नसती; परंतु लढाईत चाललेल्या तोफांच्या धडधडाटानें असा चमत्कार झाला कीं, किल्ल्यांतल्या विहिरींचे झरे फिरून, विहिरी कोरड्या पडल्या! त्यामुळें किल्ल्यांत लोकांना जास्त दिवस टिकाव धरवला नाहीं. त्यांचे किल्ल्यांत पाण्यावांचून

हाल होऊं लागले. तेव्हां नाइलाजानें त्यांना किल्ला शत्रूंच्या स्वाधीन करणें प्राप्त झालें. ह्याप्रमाणें, हम्मीरगड झालिमसिंगाचे ताब्यांत आल्यावर त्यानें तो किल्ला व त्याचे भोंवतालचा सर्व मुलूख जप्त केला. झालिमसिंगाच्या विजयी फौजेनें आपला लढाईचा क्रम तसाच पुढें चालविला. त्यांनीं, चोंडावतपक्षीय बुसी नांवाच्या ठिकाणचा एक जाहगीरदार होता त्याची जाहगीरही जप्त करून, नंतर, त्यांणीं आपला मुख्य हेतु सिद्धीस नेण्यासाठीं चितोडाकडे मोर्चा फिरविला. तो तेथें त्यांस आपल्या मुख्य पलटणींसहवर्तमान शिंदाही येऊन मिळाला.

मेवाडच्या राण्याविषयीं मराठ्यांच्या मनांत पहिल्यापासून फार पूज्यभाव होता. व खुद्द पेशवेसुद्धां आपली व राण्याची भेट होणें हा मोठा सन्मान समजत असत. त्या प्रकारचा सन्मान आपल्यासही मिळाला पाहिजे; अशी महादजी शिंद्याची फार दिवसांची इच्छा होती. ही इच्छा पुरवून आपल्याकडे महादजी शिंद्याचा विश्वास आणि ओढ जास्त लावून घेण्याचे हेतूनें, झालिमसिंगानें शिंद्याची आणि राण्याची भेट करून देण्याचें ठरविलें. राणा तर सर्वांशांनीं झालिमसिंगाचेच स्वाधीन असल्यामुळें, त्याजकडून झालिमसिंगाच्या ह्मणण्याला मुळींच हरकत न येतां, त्यानेंही शिंद्याची भेट घेण्याचें कबूल केलें. नंतर झालिमसिंग शिंद्याला घेऊन उदेपुराजवळ आला; व तिकडून राणाही शिंद्याचे भेटीकरितां कांहीं कोश पुढें येऊन, त्या उभयतांची 'वाघाची टेंकटी' ह्मणून एक उदेपुराजवळ ठिकाण आहे तेथें भेट झाली. आणि नंतर शिंद्यानें बहुमानपूर्वक आपली फौज देऊन राणाजीस त्याच्या राजधानीपर्यंत पोंचविलें. ह्याप्रमाणें, झालिमसिंग हा शिंद्याचे बरोबर भेटाभेटीच्या कामांत गुंतला असतां, तिकडे चितोडास, अंबाजी इंगळे हा एकटाच सर्व फौजेसुद्धां राहिला होता. ती संधि बघून त्यानें तिकडे बंडवाल्या चोंडावतांशीं फितुरी चालविली. अंबाजी इंगळे यास महादजी शिंद्यानें साह्यासाठीं झालिमसिंगाबरोबर पाठविलें होतें; व त्यामुळें त्याला झालिमसिंगाचा ताबेदार ह्मणून वागावें लागत असे. हा कमीपणा कसेंही करून काढून टाकिला पाहिजे, अशी अंबाजीला महत्वाकांक्षा उत्पन्न होऊन, वर लिहिल्याप्रमाणें झालिमसिंग चितोडास नाहीं ही संधि राखून, तो चोंडावतांकडे फितूर झाला. त्यानें आपला फितूरीचा हेतु साळुंब्रावाला भीमसिंग ठाकूर यास कळवून, त्याची संमति मिळविली होती. झालिमसिंग याचे काय काय गुप्त हेतु होते ते त्यानें कधींही कोणाजवळ सांगितले नव्हते. परंतु अंबाजी इंगळे हा झालिमसिंगापेक्षांही फार धूर्त असल्यामुळें त्यानें, झालिमसिंगाच्या एकंदर चालचर्येवरून त्याचा गुप्त हेतु पूर्णपणें जाणून, त्याला ह्याप्रमाणें बेमालूम फसविण्याची हिकमत योजिली. अंबाजी इं-

गळे हा जितका धूर्त आणि कावेबाज होता तितकाच जर झालिमसिंगही धूर्त आणि कावेबाज असता, तर त्यानें अंबाजीची फितूरी उपडी पाडली असती व त्याच्या कपटपाशांतून तो अचूक सुटला असता. परंतु तशी गोष्ट झाली नाहीं. झालिमसिंगाच्या गैरसावधपणानें त्याला आपला गैरफायदा सोसावा लागला व त्याची रजपुतांमध्यें फजीती मात्र झाली. अंबाजी इंगळे हा जो चोंडावतांकडे फितूर झाला त्यामध्यें त्यानें सालुंब्याचा ठाकूर भीमसिंग याजकडून अशी कबुली करून घेतली कीं, 'चितोडचा किल्ला व शहर राण्याचे स्वाधीन करून त्याला शरण जावें; आणि वीस लाख रुपये राण्याला देऊन, झालिमसिंगानें जो आपला मुलूख जप्त केला आहे तो राण्याकडून मोकळा करून घ्यावा.' चोंडावतांचा झालिमसिंगाशीं जो पहिल्यापासून द्वेष होता त्यामुळें त्यांना अंबाजी इंगळ्याची ही मसलत सर्वांशानीं कबूल झाली. आणि तेणेंकरून, अंबाजीला जो आपला कार्यभाग पुढें साधावयाचा होता तोही अनायासें सिद्धीस गेला. अंबाजीची हीही खात्री होती कीं, आपण जी ही मसलत करीत आहोंत तो मोडून काढण्यास आपल्या पक्षाकडील कोणीही लोक पुढें येणार नाहींत. परंतु, खुद्द शिंद्याला मात्र ही मसलत पसंत पडण्याचा संशय होता. तरी, त्याला पुण्याकडे निघून जाण्याची फार घाई असल्यामुळें तो सहसा आपली ही मसलत फसूं देण्यास कारण होणार नाहीं, असा अंबाजीला भरंवसा होता; व त्याप्रमाणेंच पुढें अनुभवही आला. अंबाजी इंगळ्यानें जो हा इकडे फितूरीचा कट केला तेणेंकरून, झालिमसिंगाचे हेतु ठिकाणच्या ठिकाणींच राहून, हारौटी आणि मेवाड यांचें ऐक्य करून राजस्थानांत एक बलिष्ठ राष्ट्र करण्याची त्याची बाह्यात्कारची खटपट व्यर्थ झाल्यासारखी झाली. झालिमसिंगाचे शत्रु (चोंडावत) हे राण्याला मराठ्यांचें साह्य मिळाल्यामुळें मोठ्या कचाटींत सांपडले होते. परंतु पुढें त्यांना जेव्हां कळलें कीं, मराठे हे आपल्याचकडे मिळत आहेत, तेव्हां तर त्यांना झालिमसिंगाची कांहींच दहशत वाटेनाशी झाली. झालिमसिंग हा पहिल्यापासून अंबाजीशीं फारच सख्यानें वागत असे. याचें कारण, एकें तर त्याच्या साह्यानें त्याला आपला पुढील मोठा कार्यभाग उरकून घ्यावयाचा होता; आणि दुसरें कारण असें होतें कीं, पूर्वी जेव्हां उज्जनीस लढाई झाली, तेव्हां त्या लढाईत झालिमसिंग जखमी झालेला मराठ्यांचा सरदार त्र्यंबकजी याला सांपडला व त्यानें त्याला फार चांगल्या रीतीनें वागवून त्याचें रक्षण केलें; हा त्याचा फार मोठा उपकार झालिमसिंग समजत होता. आणि त्र्यंबकजीचा मुलगा हा अंबाजी इंगळे असल्यामुळें, त्याचे संबंधानें विशेष प्रेमभाव दाखविणें झालिमसिंगाला भागच होतें. अशा कारणांनीं झालिमसिंगानें अंबाजीशीं फारसा परकेपणा पहिल्यापासूनच ठेविला

नव्हता. परंतु अंबाजीचा रोख व हेतु अगदीं वेगळा असल्यामुळें, आणि त्याला झालिमाचा पुढील हेतु काय होता हें साधारणतः अनुमानित झालें असल्यामुळें, त्यानें वर लिहिल्याप्रकारची फितुरी करून झालिमसिंगाचीं अगदीं फजिती करण्याची मसलत योजिली.

आतां झालिमसिंग उदेपुरास गेला आहे; तो तिकडून पुनः परत आला तर चांगलें नाहीं, व कदाचित् आपली मसलत फसेल; असें अंबाजीस वाटून, त्यानें त्वरेनें भीमसिंग साळुंब्रावाला यास, राण्याकडे जाऊन त्याचे पायां पडण्याची तयारी चालविली. झालिमसिंगानें, आपल्या मागें ही अशी व्यवस्था झाल्यामुळें आतां आपलें काम कांहींच उरलें नाहीं असें समजून, व आपली नाचक्की व फजिती झाल्यासारखी दिसूं नये ह्मणून, असा बाहणा केला कीं, 'मला कोट्यास तावडतोब निघून येण्याविषयीं बोलावणें आलें आहे, ह्मणून मी जातों.' झालिमसिंग हा मोठा मानी असून, त्याच्या तारुण्यांत तर त्याचा तो मानीपणा फारच जोरांत होता. परंतु, ह्यावेळीं त्याचा तो मानीपणा कांहीं उपयोगाचा नव्हता. त्यानें केलेला बाहणा अंबाजी समजला. झालिमसिंगानें आपल्यास कोट्याचें बोलावणें आलें असें अंबाजीस स्वतः सांगितलें. तेव्हां तो कपटी मराठा त्यास ह्मणाला, 'तर मग ही गोष्ट तुह्मीं मला फारच आनंदाची सांगितली. व ही गोष्ट ज्यांस समजेल त्यांस आपली योग्यता किती आहे, हेंही समजल्यावांचून राहणार नाहीं!' अंबाजीचें हें बोलणें द्व्यर्थी आणि झालिमसिंगाला लागण्यासारखें होतें; परंतु, तो बिचारा त्याचे इतका छक्यापंजाचा नसल्यामुळें, त्याला, अंबाजी हा आपला मोठेपणा जाणतो, असें वाटून, आपला बाहणा चांगला साधला अशी त्याला सार्थकता वाटली. झालिमसिंगाला अंबाजी आणखी ह्मणाला, 'तर मग आपण खरोखरच कोट्यास जाणार काय?' 'होय तर, ह्यांत संशय नाहीं;' असें झालिमसिंगानें उत्तर दिलें. 'तर मग आपल्या इच्छेप्रमाणें मी आपल्याला तावडतोब आमच्या सरदार शिंद्यांकडून परवानगी आणून देतों,' असें अंबाजीनें त्याला सांगून, आपला घोडा आणावयास सांगितलें. व घोडा आल्याबरोबर त्यावर बसून तो शिंद्याचे तंबूकडे निघून गेला. झालिमसिंगाला वाटलें कीं, शिंदा आपल्याला जावयास सांगणार नाहीं; आणि त्यानें जरी जावयास सांगितलें तरी, राणा तरी निदान आपल्याला जाण्याची परवानगी देणार नाहीं. कारण, राण्याचा आपल्यावर पूर्ण विश्वास असल्यामुळें व राण्यावर आपलें तसेंच वजन असल्यामुळें, तो तर आपल्याला कोट्यास परत जाण्यास कधींच निरोप देणार नाहीं; असें झालिमसिंगास वाटलें होतें. अंबाजीच्या ह्मणण्याप्रमाणें, झालिम यास शिंद्याकडून परवानगी मिळण्यास मुळींच कांहीं हरकत नव्हती; व त्याप्रमाणें त्यानें झा-

लिमसिंगाला 'आपलीं पलटणें घेऊन जाण्यास आपली कांहीं हरकत नाहीं,' असेंही कळविलें. परंतु त्याला पुनः असें वाटलें कीं, 'झालिमाला कोट्यास जाऊं दिलें तर, पूर्वी कबूल करून घेतलेली ६४ लाख रुपयांची रकम चितोडच्या चोंडावतांकडून वसूल कशी होईल व त्याबद्दलची जबाबदारी कोणावर ठेवावी ?' शिंद्याच्या ह्या संशयाचें निराकारण अंबाजीनें केलें. तो शिंद्याला ह्मणाला, 'येवढेंच असेल तर त्या रकमेची भरपाई करून देण्याचा मी पत्कर देतों. आपण झालिमसिंगाला खुशाल जाऊं द्यावें.' असें ह्मणून, त्यानें, शिंद्याला ज्या अर्थी दक्षिणेकडे जाण्याची घाई होती त्या अर्थी, झालिमसिगानें शिंद्याला कबूल केलेला सर्व ऐवज पोंचता होण्यासाठीं, दक्षिणप्रांतांत हुंड्या दिल्या; व शिंद्याला झालिमसिंगाची जरूर वाटूं दिली नाहीं. तो शिंद्याला ह्मणाला, 'मी आपल्याला ह्या हुंड्या देतों, व मागाहून मी चोंडावतांपासून तो सर्व ऐवज वसूल करून घेईन.' शिंद्याला येऊन जाऊन काय तो पैसाच पाहिजे होता, त्याप्रमाणें, अंबाजीनें ज्या अर्थी आपल्या जबाबदारीवर त्याला तो सर्व ऐवज दिला त्या अर्थी, त्याला झालिमसिंगाशीं अथवा खुद्द राण्याशींही कांहीं करावयाचें राहिलें नव्हतें. आणि त्याचवेळीं त्यानें आपलें अंग मेवाडांतून काढून, पुण्याकडे जाण्याची तयारी केली. शिंद्यानें मेवाडांतून निघतांना आपल्या वतीचा व आपला मुख्त्यार ह्मणून अंबाजी इंगळे यास नेमून, त्याचे स्वाधीन पुष्कळ सैन्य केलें. त्याच्या ताब्यांत महादजी शिंद्यानें आपलें इतकें सैन्य ठेवण्याचें कारण इतकेंच कीं, ज्या अर्थी त्यानें त्याला इतकी रकम वसूल होण्याचे अगोदर भरपाई करून दिली त्या अर्थी, त्याला ती रकम मागाहून वसूल करण्यास हरकती येऊं नयेत.

ज्या उद्देशानें अंबाजी शिंद्याकडे गेला होता तो उद्देश ह्याप्रमाणें पूर्ण करून, नंतर तो शिंद्याचे तंबूंतून निघाला; तों तसाच राण्याचे दिवाण शिवदास आणि सतीदास यांचे तंबूकडे गेला; आणि तेथें त्यांची भेट घेऊन, त्यांचेंही त्यानें मन वळविलें. झालिमसिंगाच्या एकंदर हेतूंचें जें त्यास अगोदर अनुमान झालें होतें तें त्यानें त्यांना कळवून, आपला पुढील हेतुही त्यानें त्यांस कळविला, व त्यामध्यें त्यांचाही फायदा दाखवून, राण्याचे वैभवास व अधिकारास कोणत्याही प्रकारें कमीपणा न येतां, उलट झालिमसिंगाला जाऊं दिल्यास त्यामध्यें जास्त हितच आहे, असें खुलाशानें आणि बरेंच तिखटमीठ लावून सांगितल्यामुळें, त्या दिवाण बंधुद्वयाची, त्यानें, झालिमसिंगाला जाऊं देण्याविषयीं परवानगी मिळविली, ह्याप्रमाणें, अगदीं थोड्या वेळांत अंबाजीनें दोन्ही ठिकाणच्या परवानग्या मिळवून, तो तें वृत्त झालिमसिंगाला कळविण्यासाठीं परत निघाला. त्यानें हें काम इतक्या चौख रीतीनें केलें होतें कीं, तो परत येऊन झालिमसिंगाला शिंद्याचा व राण्याचा हुकूम

कळवितो आहे तोंच, राण्याकडून झालिमसिंगाकडे रजेचा हुकूम देण्यासाठीं त्याचा जासूद येऊन पोहोंचला. राण्याचा रजेचा हुकूम येईल असें झालिमसिंगाला बिलकुल वाटलें नव्हतें. परंतु तोही आला हें पाहून, नाइलाजानें तो कोट्यास निघून गेला. झालिमसिंग निघून गेल्यावर, अंबाजीनें पूर्वीं ठरवून ठेविल्याप्रमाणें, भीमसिंग साळुंब्रावाला हा चितोडच्या किल्ल्यावरून खालीं उतरला. आणि, त्यानें जाऊन राण्याचे पाय धरिले. तिकडे शिंद्याचा द्रव्यार्जनाचा हेतु पूर्ण होऊन तो पुण्याकडे निघून गेला; आणि अंबाजी इंगळे हा स्वतंत्रपणें मेवाडची बरीवाईट गति लावण्यास जोरदार मराठा राहिला. उदेपूरच्या दरबारांत सुक्तावतांचें वजन कायम होऊन जास्त जास्त वाढत चाललें; आणि त्यांनीं, आपले शत्रु जे चोंडावत त्यांच्या ताब्यांतील मुलखाची वाटेल तशी विल्हेवाट लावण्यास, मराठ्यांना जणूं काय पूर्ण स्वातंत्र्यच दिलें. परंतु ह्याचा परिणाम काय होईल हें त्यांच्या लक्ष्यांत मुळींच कांहीं वागलें नाहीं. तिकडे झालिमसिंगाला, आपण योजिलेलीं कामें आणि महत्वाकांक्षातृप्तीचे मार्ग अशा चमत्कारिक रीतीनें बंद पडल्यामुळें तोंडघशीं पडल्यासारखें झालें; व त्यामुळें त्याला आपला फार अपमान झाला असें वाटूं लागलें. पुढें, तो जो कोट्यास जाऊन बसला तो पुन: कोणत्याही प्रकारच्या राजकीय किंवा इतर व्यावहारिक कृत्यांत आपलें अंग असल्याचें न दाखवितां, केवळ एकांतवासांतच त्यानें आपले राहिलेले दिवस घालविले. अंबाजीकडे मेवाडदेशाची सर्व सत्ता आली; व चोंडावतांचीं गांवें वगैरे पैशाचे फेडीकरितां त्याचे ताब्यांत दिलीं गेलीं.

अंबाजी इंगळे हा मेवाडांत ८ वर्षें राहिला. तितक्या काळांत त्यानें इतका पैसा गोळा केला कीं, त्याचे योगानें त्याला आपलें पूर्ण स्वातंत्र्य हिंदुस्थानांत चांगल्या रीतीनें गाजवितां आलें, व त्या प्रांतांत तो एक मोठा जोरवान् सरदार झाला. त्याचे जवळ २ कोट रुपयांची पुंजी झाली. हे सर्व रुपये त्यानें मेवाडच्या जमिनीचे उत्पन्नांतून मिळविले. त्यानें इतका पैसा मिळविला खरा; पण त्याचे बदला त्यानें मेवाडच्या लोकांस पुष्कळ सुख आणि वैभव यांची प्राप्ति करून दिली. ह्या दोन्ही गोष्टी त्या लोकांस बरेच दिवसांत मिळाल्या नव्हत्या. अंबाजी इंगळ्याच्या कारकीर्दीत मेवाडचें वजन बरेंच वाढलें; व आपसांतील वादविवाद बंद पडून, लोकांना शांतिसौख्याचा लाभ झाला. महादजी शिंदा ह्यानें पुण्यास जातेवेळीं अंबाजीला मुख्य चार गोष्टी करावयास सांगून ठेविलें होतें:—

१ ली.—राण्याचे सर्व अधिकार त्याचेकडे परत द्यावे; आणि बंडवाले चोंडावत व शिरजोर झालेले लष्करी सिंधी लोक यांनीं दाबून बळकावलेल्या जमिनी राण्याच्या राण्याकडे द्याव्या.

२ री.—तोतयाला कुमळमेराहून हुसकून द्यावें.

३ री.—मारवाडच्या राजापासून गोदवाडप्रांत काबीज करावा. आणि,

४ थी.—बुंदीच्या राजपुत्रानें राणा उरसी याचा वध केल्यामुळें पडलेल्या तंट्याचा निकाल करावा.

राण्याला २० लाख रुपये देण्याचें साळुंब्र्याला भीमसिंग यानें कबूल केलें होतें. त्यांची वांटणी अशी केली कीं, चोंडावतांच्या मुलुखावर १२ लाख रुपये बसविले आणि सुक्तावतांच्या प्रांतांतून ८ लाख रुपये वसूल केले. चोंडावतांकडून १२ लाखांबद्दल पुढें लिहिल्याप्रमाणें एकेका संस्थानावर रकमा बसविल्याः—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| साळुंब्रासंस्थानाकडून | | घेतले | रुपये | ३ | लाख. |
| देवगडवाल्याकडून | | ,, | ,, | ३ | ,, |
| सिंगिनगडवाला (वरील दोघां ठाकुरांचा मसलतगार) याजकडून | | ,, | ,, | २ | ,, |
| कुशीतळ | ,, | ,, | ,, | १ | ,, |
| अमाइत | ,, | ,, | ,, | २ | ,, |
| कोरावड | ,, | ,, | ,, | १ | ,, |
| | | एकूण | रुपये | १२ | लाख झाले. |

अंबाजीनें शिंद्याला जे ६४ लाख रुपये अगाऊ दिले होते ते सर्व चोंडावतांकडून विनबोभाट वसूल केले; व त्यांशिवाय त्याचे फौजेचा खर्चही त्यानें चोंडावतांवरच लादला. अंबाजीनें दोन वर्षांतच तोतयाला कुमळमेराहून घालवून दिलें. एका राणावत रजपुतानें बंड केलें होतें, त्याजकडून जहाजपूर नांवाचा प्रांत घेतला. आणि ज्या सरदारांकडे राण्याचे जे प्रांत त्यांच्या देण्याघेण्याबद्दल गेले होते ते सर्व, त्यांचें जें देणें होतें तें त्यांस देऊन, त्यांजकडून सोडवून राण्याचे राण्याला परत देण्यांत आले.[1] ह्या प्रांतांतील जमिनीचें आणि व्यापारासंबंधीं उत्पन्न सुमारें ५० लाखांचें होतें. अंबाजी याजकडे नेमून दिलेल्या कामांपैकीं, 'गोदवाडप्रांत काबीज करण्याचें राहिलें होतें; बुंदीच्या राजाशीं असलेला वाद मिटला नव्हता; व त्याचप्रमाणें, मराठ्यांकडे त्यांच्या देण्याबद्दल ज्या राण्याच्या जमिनी वगैरे लावून दिल्या होत्या त्या राण्याकडे परत देणें राहिल्या होत्या. इतकीं कामें होण्याचीं राहिलीं होतीं तरी, अंबाजीनें आपल्याला 'मेवाडचा सुभेदार' अशी पदवी घेऊन, तो आपल्याला राण्याच्या पूर्णपक्षाचा असें ह्मणवूं लागला. शिंद्यानें त्याजकडे राण्या-

१. हे प्रांत ह्मणजे—सिंधीलोकांपासून रायपूर, राजनगर; पुरावतांकडून गुर्लो व गादरमाला; सरदारसिंगाकडून हम्मीरगड; आणि साळुंब्रावाल्याकडून कुर्अकुवारियो.

साठीं जीं जीं कामें करण्याचीं सोंपविलीं होतीं तीं जरी पूर्णपणें त्याजकडून अमलांत आलीं नाहींत व त्यानें बहुतकरून आपलें स्वतःचें हित करण्याकडेच लक्ष्य दिलें होतें, तथापि, त्यानें राण्याचा पक्ष व त्याच्याच बद्दलचा अभिमान हे न सोडतां, त्याचा बोज व सन्मान चांगला ठेवला. राण्याचे प्रधान शिवदास आणि सतीदास यांस पहिल्यापासून चोंडावतांची फार भीति होती. ५ त्यांना असें वाटे कीं, आपल्या भावाप्रमाणेंच चोंडावतांकडून आपला घात होईल. आतां तर त्यांचें स्वतःचें व खुद्द राण्याचें संरक्षणही अंबाजी इंगळ्यावरच केवळ अवलंबून होतें, हें वेगळें सांगणें नकोच. तेव्हां, त्यानें असेंच आपल्या लष्करासहवर्तमान मेवाडांत राहून आपलें रक्षण करावें ह्मणून, राण्यानें प्रधानांचे विचारें अंबाजीशीं वेगळा तह करून, त्याचे फौजेच्या खर्चासाठीं ७५,००० रुपये दरमहा किंवा ९ लाख रुपये वर्षाचे देण्याचें ठरविलें. व तितक्या उत्पन्नाचे महाल त्याजकडे लावून दिले. ह्याप्रमाणें, मेवाडांतल्या वसूलउत्पन्नाची एकंदर व्यवस्था जिकडच्या तिकडे लागली गेली. परंतु यामुळें झालें काय ? उदेपूरच्या खजिन्यांत शिलक ह्मणून नाहींशी झाली; वि० सं० १८५१ ह्या वर्षी राण्याच्या बहिणीचें जयपूरच्या युवराजाबरोबर लग्न होण्याचें ठरलें. तेव्हां, राण्याला त्या लग्नासाठीं अंबाजीकडून ५ लाख रुपये कर्जाऊ घ्यावे लागले !

ह्यापुढील वर्ष मुख्यत्वें ह्या तीन गोष्टींनीं विशेष लिहून ठेवण्यासारखें आहे; त्या वर्षांत राण्याची आई वारली; राण्याला मुलगा ह्मणजे उदेपूरच्या गादीला युवराज झाला; आणि उदेपूरच्या तलावाची पाळी फुटून त्यामुळें, उदेपूरशहरची तिसरा हिस्सा वस्ती वाहून गेली. उदेपुरावर हा जो शेवटचा अनर्थ गुजरला हा केवळ, राण्याची धर्माचारावरील अश्रद्धा आणि त्यानें जो गौर्युत्सवाचा[१] नवीन प्रकार सुरू केला त्यामुळें, ग्रामदेवतांचा क्रोध होऊन, त्याचे योगानें प्राप्त झाला, अशी लोकांची समजूत आहे.

पुढें, अंबाजीला शिंद्यानें आपला 'हिंदुस्थानांतला प्रतिनिधि व मुतालिक' असा किताब देऊन, त्यास, उत्तरेकडे जाण्यास हुकूम दिला. तेव्हां अंबाजीनें आपल्या वतीचा मुख्त्यार ह्मणून गणेशपंत यांस मेवाडांत नेमून, आपल्या वरिष्ठाचे हुकुमाप्रमाणें दिल्लीकडे कूच केलें. गणेशपंतांबरोबर राण्याच्या तर्फेचे वकील सवाई मेहेता व शिरजी मेहता हे दोघे बंधु काम करण्यास होते. परंतु, त्या तिघांनीं

१. हा गौर्युत्सव ह्मणजे भाद्रपद शुद्धपक्षांत जो होतो तो.

२. ह्या दोघां भावांविषयीं टॉड् ह्मणतो कीं, 'यांतील पहिला ह्मणजे सवाई मेहेता हा हल्लीं (टॉडच्या वेळीं) जवानसिंगाच्या जिंदगीचा कारभारी आहे. हा अगदीं निर्बुद्ध आहे, व दुसरा भाऊ शिरजी

आपल्या अधिकाराचा अत्यंत दुरुपयोग केला. त्यांनीं आत्महितावर लक्ष्य देऊन, भलत्याच रीतीनें अम्मल चालविण्यास प्रारंभ केला; व होईल तिकडून आपलें घर भरण्याकडे धोरण ठेविलें. ही कुरकुर जेव्हां अंबाजी इंगळ्याला कळली तेव्हां त्यानें गणेशपंताला एकदम दूर करून, त्याचे जागीं प्रसिद्ध रायचंद याची नेमणूक केली. ह्या रायचंदाचें आणि राण्याच्या वकिलांचें परस्पर पटेना; आणि तेणेंकरून त्यांच्यामध्यें दुफळी माजून, उदेपुरामध्यें फार अव्यवस्था उत्पन्न झाली. रायचंद याचा राण्याचे वकील द्वेष करूं लागले. मेवाडावर रोहिले, फ्रेंच आणि मराठे या तिघांची निरनिराळी दृष्टि लागून, तिघेही, निरनिराळ्या रीतीनें आपल्या उत्कर्षाविषयीं प्रयत्न करूं लागले. प्रत्येकाच्या निरनिराळ्या लुचेगिऱ्या चालून, मेवाडप्रांतावर मात्र पुनः अशांतीचीं अभ्रें येऊं लागलीं. अंबाजीच्या दराऱ्यानें चोंडावत रजपूत जे अगदीं मऊ व गरीब होऊन, त्यांतील कित्येक सरदारांच्या जहागिऱ्या व इनामें वगैरे जप्त झालीं होतीं ते सरदार, हा असा गर्दीचा प्रसंग बघून, दांडग्या सिंधी लोकांस मिळाले; आणि त्यांनीं मेवाडदेशांत चोहोंकडे पुंडावीं मांडलीं. असें झालें तेव्हां राण्याच्या लोकांकडून त्या बंडखोरांवर हल्ला करण्यांत आला. त्यांनीं साळुंब्र्याच्या किल्ल्यावरही तोफांची सरबत्ती चालविली. कारण, त्या किल्ल्यावर चोंडावतांचा व त्यांचे साह्यकर्ते दांडगे सिंधी लोक ह्यांचा जमाव आश्रय धरून राहिला होता. शिवाय, राण्याच्या पक्षीयांनीं कोरावडही काबीज केलें. असें झालें तेव्हां त्या ठिकाणचे सिंधी लोक पळून गेले आणि देवगडच्या किल्ल्यांत ते आश्रय धरून राहिले. अशी जेव्हां चोहोंकडून गर्दी उसळली तेव्हां कित्येक विचारी चोंडावतांनीं, हा चालू असलेला प्रकार चांगला नाहीं असें लक्षांत आणून, बिथरलेल्या चोंडावतांची व मराठ्यांची स्थिरस्थावरता करण्यासाठीं अंबाजीकडे बोलणें लावण्याकरितां ह्मणून आपल्या वतीनें एक वकील पाठविण्याचा ठराव केला. ह्यावेळीं अंबाजी हा दत्तियाच्या राज्यावर स्वारी करण्यांत गुंतला होता. त्याजकडे मारवाडचा राजा अजितसिंग यास आपल्या वतीनें बोलण्यासाठीं पाठविण्याचें चोंडवतांनीं योजिलें. मेवाडच्या घालमेलीमध्यें पहिल्यापासून अजितसिंग हा होताच. तेव्हां, त्याजकडूनच झाली तर चांगली व्यवस्था लागली जाईल असें चोंडावतांस वाटलें. मराठ्यांचा पहिल्यापासून

---

मेहेता हा, मी उदेपुरास आलों तेव्हां राण्याच्या मंत्र्यांपैकीं एक होता. शिरजी मेहेता हा एक अद्वितीय सुस्वभावी होता, परंतु कुलंगडीं उत्पन्न करण्याकडे त्याची प्रवृत्ति असून, राण्याचें गेलेलें ऐश्वर्य फिरून मिळविण्याचा व्यर्थ यत्न करणाऱ्या मंडळींतील तो एक होता. त्याचेविषयीं मला फारशी माहिती नसल्यामुळें, तो पटकीनें एकाएकीं मेला तरी, त्याविषयीं मला कांहीं फारसें दुःख वाटलें नाहीं.'

पैशावर डोळा असल्याचें आतां पुनः पुनः सांगणें नकोच. चोंडावतांकडून बोलणें करण्यास अजितसिंग आलेला पाहून, त्या लोभी अंबाजीनें, चोंडावतांपासून आणखी १० लाख रुपये घेऊन, मेवाडांतून आपला मुख्त्यार हालविण्याचें कबूल केलें. त्याचप्रमाणें, वरील रक्कम घेऊन, ह्यापुढें मराठ्यांनीं सुक्तावतांचा व राण्याचा प्रधान शिवदास यांचा पक्ष सोडावा;'आणि चोंडावतांना अनुकूल असेल तेवढें मात्र साह्य करावें, असें ठरलें. असें झालें तेव्हां साळुंब्र्याच्या ठाकुराचा राण्याच्या दरबारांत पुनः प्रवेश होऊन, अगरजी मेहेता हा राण्याचा दिवाण झाला. नंतर चोंडावतांनीं सुक्तावतांवर स्वाऱ्या करकरून, अंबाजीला द्यावयाचे १० लाख रुपये त्यांजपासून वसूल केले; आणि त्यांची भरपाई मराठ्यांकडे करून, त्यांच्या ऋणांतून ते मुक्त झाले. ह्या घालमेलींतच चोंडावतांनीं सुक्तावतांचीं हींथा आणि सायमारी हीं दोन जहागिरीचीं ठिकाणें जप्त केलीं.

ह्या ठिकाणीं राण्याच्या वरील नवीन दिवाणाचे संबंधानें वगैरे कांहीं विशेष माहिती देणें उचित दिसतें. टॉड् ह्मणतो, 'दिवाण अगरजी मेहेता हा माझ्या वेळेस उदेपूरच्या दरबारीं मुलकीखात्याकडील मुख्य प्रधान ह्मणून नेमिला होता. त्यावेळीं त्या दरबारांत त्याच्या बरोबरीचा दुसरा कोणीही मनुष्य नव्हता.' उदेपूरच्या दरबारांतून पांचोलीवंशाकडची दिवाणगिरी निघाल्यापासून ह्या मेवाडच्या राज्याला भरभराटी ह्मणून पुढें कधींच आली नाहीं. टॉड् ह्मणतो, 'पांचोलीवंशांतील कित्येक पुरुष माझ्या हाताखाली होते.' ह्या पांचोलीवंशजांकडून राण्याला किंवा इतर कोणाला जीं मसलतीचीं किवा अभिप्रायाचीं पत्रें जात तीं मोठीं ठाकठिकीनें व बेतवार लिहून पाठविलेली असत. बंडखोर सरदारांचे हातांत मेवाडदेशाचा कारभार गेल्यानंतर अर्थात् पांचोलीघराण्यांतील दिवाणगिरी निघाली, व ती मेहेता, ढेप्रा किंवा धाभाई यांचे हातीं गेली. पांचोली घराण्याकडून जे कागद मिळाले आहेत त्यांमध्यें कित्येक पत्रें राणा भीमसिंग आणि त्याचा वर लिहिलेला दिवाण अगरजी मेहेता यालाही लिहिलेलीं मिळालीं आहेत. तीं पत्रें देशाभिमानानें पूर्णपणें भरलेलीं असून, त्यांजवरून त्यावेळची त्या देशाची काय स्थिति होती हेंही दिसत आहे. वि० सं० १८५३ ह्मणजे इ० स० १७९७ ह्यावर्षी अमृतराव पांचोली यानें, मेवाडदेशावर जीं अनेकप्रकारचीं संकटें येतात तीं दूर करण्याचे उपाय योजण्याची एक नवीन कल्पना काढली. त्यानें राण्याला वारंवार सांगून सांगून, त्याच्या मनांत असें भरविलें कीं, मेवाडच्या राजकारस्थानांतून सुक्तावत आणि चोंडावत यांचा हात अगदीं काढून, परकीय सरदार जेव्हां त्यामध्यें पडतील तेव्हांच काय ती मेवाडच्या राज्यस्थितीमध्यें सुधारणा आणि व्यवस्था होईल असें जें मत आहे, तें अगदीं भ्रांतिमूलक आहे.

अमृतरावानें आपलें हें ह्मणणें पुढे लिहिल्याप्रमाणें आपल्या पत्रांतून कळविलें आहे:—

"देशावर जो आपद्रोग येतो तो पुढील कारणांनीं येतो:—मत्सर आणि पक्षाभिमान. "हीं दोन कारणें महाभयंकर असून, कोणत्याही देशाला रसातळीं घालण्यास जबरदस्त "आहेत. हा आपद्रोग ह्या देशावर तुर्कांच्या (मोगलांच्या) मुळें आला. परंतु त्या- "वेळीं मेवाडचे राज्यकर्ते, त्यांचे दिवाण आणि त्यांचे सरदार हे सर्व एकचित्त असल्या- "मुळें, त्या रोगावर तें ऐक्यरूपी औषध फार चांगलें व रामबाण मिळून, हा देश रोगनि- "र्मुक्त झाला; व त्याचा प्रसार फारसा झाला नाहीं. पुढें राणा जयसिंगाचे वेळीं पुनः "तो रोगोद्भव झाला; परंतु तो, जयसिंगाचा मुलगा उमरावसिंग यानें, नाहींसा केला. "राणा उमरावसिंग याने, आपल्या राज्यांत जे अनेक प्रकारचे घोंटाळे माजले होते ते "सर्व नाहींसे करून व आपल्या राज्यांतील प्रत्येकाचे हक्क आणि प्रत्येकाच्या पदव्या "ज्याचे त्याच्या योग्यतेप्रमाणें ज्याचे त्याच्याकडे देऊन, सर्वत्र आबादानी करून दिली. "पण पुढें महाराणा संग्रामसिग याने आपल्या आश्रयाखालीं चंद्रावत (चोंडावत) "ह्मणून एक पक्ष रामपुरा येथें उत्पन्न केला; आणि तेव्हांपासून मेवाडचा बंदिस्थपणा "किंवा एकवाक्यता मोडली. बिहारीदासावर अनेक प्रकारचीं संकटें व अनर्थ गुजरून "व पुढें त्याच्या मुलानें आत्महत्या केल्यापासून तर ह्या देशावरील आपद्रोगाची वृद्धि "जास्त जास्तच होत चालली. यालाही या रोगोद्भवांचीं कारणें जीं वर लिहिलीं "आहेत तींच कारण असून, तीं दिवसेंदिवस जसजशीं वाढत चाललीं तसतशी रोग- "वृद्धीलाही विशेष भरती येत चालली, हें सांगणें नकोच. ह्या देशावर सरदार बाजी- "राव याचे सैनापत्याखालीं जी दक्षिणी लोकांची स्वारी आली तिच्या योगानें, जयपूर "येथील गंडबडीने[1]; आणि राजमहाल येथें जें अपयश मिळालें त्याचे योगानें, आपल्या "देशाला अतिशय खर्चाखालीं यावें लागलें व रोगाचें प्राबल्य जास्तच वाढलें. या "प्राबल्यामध्येंच जगत्सिगाची वेळ सामील करा; आणि त्यावेळीं धाभाई यांचें पांचो- "लीवंशाशीं जें द्वैत माजलें होतें त्याचे योगानें तर, स्वदेशांत आणि परदेशांत, चोहोंकडे "आपल्या लोकांची अगदीं बदनामी होऊन, आपलें पूर्वींचें वजन नाहींसें झालें. व तेव्हां- "पासून प्रत्येक मनुष्यास असें वाटूं लागलें आहे कीं, सरकारची आणि आपली जबाबदारी "एकसारखीच आहे. याचे योगाने अर्थात् राजाचा मान अगदींच कमी झाला. जगत्सिंगा- "लाही त्याचा मुलगा प्रतापसिग याच्या बंडखोर वर्तनानें बहुत त्रास सोसावा लागला; "आणि, त्यावेळीं, इयाम सोळंखी व इतर कित्येक सरदार विश्वासघातानें कापले गेले. "तेव्हांपासून उदेपूरच्या सरदारांचीं मने आजपर्यंत कधींही राजनिष्ठ झालीं नसून, तीं "आपल्या राजाविषयीं आपलेमध्यें काळेंबेरें बाळगून, नेहमीं अविश्वस्त असतात. "त्यांना आपल्या राण्याविषयीं कोणत्याही प्रकारचा भरंवसा वाटत नाहीं. बरें, पुढें प्र- "तापसिंग राणा गादीवर बसल्यावर, महाराजा नाथजी यानें आपले जे विचार होते

---

१. जयपूर येथील गडबड ह्मणजे, राण्याचा भाचा माधवसिंग याला जयपूरच्या गादीवर बसवि- ण्याचे संबंधानें जी धामधूम उडाली ती. (मागें पृष्ठ ३१५ पहा).

"ते उघडपणें बोलून दाखवून, चालत आलेल्यां अव्यवस्थेंत कांहीं तरी सुधारणा हो-
"ईल अशी आशा बाळगिली. परंतु त्याच्या त्या स्पष्टवक्तेपणानें त्याला व त्याच्या एकं-
"दर वंशाला प्रायश्चित्त भोगावें लागलें! असें झालें तेव्हांपासून सर्वत्र द्वेष, संशय
"आणि फसवणुका हीं उत्पन्न झालीं. यामध्येंच हल्लीं अमरचंद दिवाणजीकडून जीं मनखी
"कृत्यें होत आहेत तींही मिळवा. तीं आणि त्यांशिवाय पांचोलींचें एकमेकांशीं भांडण व
"त्यांचा डेप्रा कारभाऱ्यांशीं द्वेष हींही ह्या देशावरील आपद्रोगाची वृद्धि करणारींच आ-
"हेत. या अशा भांडणांनीं व द्वेषांनीं आपल्या देशांत मतभेद होऊन दोन पक्ष झाले;
"आणि त्यांच्यामुळें सर्वांची दाणादाण होऊन, कोठेंच कोणाचा मान उरला नाहीं. असें
"झालें तथापि, कोणाचेच डोळे उघडून, कोणीच आपलेमधील वाद आणि द्वेष कमी क-
"रीना; तेव्हां, तेणेंकरून, वर लिहिलेल्या रोगावर तें विशेषच कुपथ्य झालें. खुमान-
"सिंग आणि सुक्तावत यांचेमध्यें हींथा संस्थानच्या मालकीविषयीं जो वाद पडला
"त्यानेंही ह्या देशावरचीं संकटें अधिकच वाढलीं. आणि पुढें, महाराजा नाथजी याचा
"विश्वासघातानें वध व त्यामुळें देवगडच्या यशवंतसिंगाला तिरस्कार येऊन त्यानें के-
"लेला एकांतवास; तोतया राणा रत्नसिंग हा उभा राहून त्याचें एक बंड उभें राहिलें;
"रघुदेव झाला याचा आपल्या अधिकारपदवीविषयींचा वाद उपस्थित झाला; आणि
"दिवाण अमरचंद यानें टाकभाड्याचे अशा सिंधी लोकांची विशेष खुषामत केली; ह्या
"सर्व गोष्टी एकंदरीनें फारच अनिष्ट होऊन, हल्लींच्या आणीबाणीच्या प्रसंगावर देश-
"स्थिति येऊन पोंचली. छानछोकपणानें व चैनाविलासांनीं कर्तव्यकर्मात हयगयी होऊं
"लागल्या; आणि राणा उरसी याच्या धाभाईनें जीं कुलंगडीं केलीं तेणेंकरून, आपली
"देशस्थिति सुधारण्याविषयींचे आणि रोगदूरीकरणाचे जे जे उपाय करण्यांत आले ते ते
"सर्व व्यर्थ जाऊन, उलट रोगाचें पुढें पाऊल पडत चाललें. वि० सं० १८२९ ह्या वर्षी
"राणा उरसी याचा बुंदीवाल्यांनीं वध केला; तेव्हां उदेपूरच्या गादीवर अज्ञान ह-
"म्मीर राणा हा बसला. त्यामुळें अशी गोष्ट झाली कीं, दरबारच्या प्रत्येक मनुष्यानें आपला
"स्वतंत्रच अधिकार वाढवून, राजत्वाचें चिन्हही उरूं दिलें नाहीं. आणि आतां आपण
"(राणा भीमसिंग) साळुंब्रावाला भीमसिंग याचे व त्याचा भाऊ अर्जुनसिंग याचे
"मताला अनुसरून आपल्या राज्यामध्यें परकीयांनां[१] घुसवून त्यांचें देणें आपल्या शिरा-
"वर घेतलें, येणेंकरून तर पूर्वीच्या भीति आणि दहशती पक्कया केल्यासारख्याच
"झाल्या. आपण आणि श्री बायजीराज (राजमाता) यांनीं परकीयांवर व दक्षिणी
"लोकांवर पूर्ण विश्वास ठेवून पूर्वीचा रोग स्पर्शजन्य रोगासारख्या भयंकर अवस्थेला
"पोंचला! आपलें मन तर ठिकाणीं नाहींसारखेंच झालें आहे; तेव्हां आतां पुढें
"काय करावयाचें? ह्या रोगाला चांगली दवा अजूनही मिळेल. आपलें सर्वांचें ऐकमत्य
"होऊं द्या; आणि पूर्वीच्या प्रधानवंशाकडे त्याची प्रधानकी परत देऊन ह्या वाढत चा-

---

१. हे परकीय ह्मणजे मराठे असून, त्यांचें देणें ह्मणजे, अंबाजीला त्याचेकडून उदेपुरांत ठेवून घेतलेल्या कुमकेच्या फौजेबद्दल जें देणें द्यावें लागे, तें होय.

"ललेल्या रोगाचें निर्मूलन करण्याचा, निदान त्याच्या वृद्धीला हरकत करण्याचा, उ-
"द्योग मनःपूर्वक चालूं द्या. असें करण्यास ह्यावेळीं जर कां हयगय झाली तर हा रोग
"अत्यंत प्रबल होऊन, त्याचें दूरीकरण मानवी शक्तीबाहेर जाईल! मुख्य दुःख द-
"क्षिणी लोकांमध्येंच आहे. त्यांचे हिशेब वगैरे काय व्हावयाचे असतील ते एकदां हो-
"ऊन जाऊं द्या; आणि त्याप्रमाणें त्यांचीं देणीं वगैरे देऊन टाकून आपल्याला त्यांचे-
"पासून सोडवून घ्या. नाहीं तर, आपला हा देश आपल्याला नेहमींचा मुकला
"असें होणार आहे! ह्यावेळीं चोहोंकडे लढाया आणि तह यांचा धुमाकूळ
"फार माजून राहिला आहे. ह्याप्रमाणें, ह्या गोष्टीचे संबंधानें मीं बहुतकरून सर्व मुख्य
"मुख्य मुद्दयांचा विचार केला आहे. ह्यांत कांहीं माझे गैरशिस्त विचार असल्यास त्या-
"बद्दल मला माफी असावी. आपल्याला प्रथमतः भावीस्थितीकडे लक्ष्य दिलें पाहिजे;
"आणि त्यासाठीं सरदार, प्रधान, आणि एकंदर रयत या सर्वांनीं एकचित्त झालें पा-
"हिजे. देश आबाद व सुखी असला तर लोकही आबाद व सुखी होतील. परंतु प्र-
"स्तुतच्या आपत्ति हा मोठा रोग याहे. तो रोग जर आपण जिंकला नाहीं, तर तोच
"आपल्याला जिंकल्यावांचून राहणार नाहीं!"

दुसऱ्या एका पत्रांत पुढें लिहिल्याप्रमाणें मजकूर आहे:—

"आपल्या देशावरील आपद्रोग हेळसांड करण्यासारखा नाहीं. त्याबद्दलचा चांगला
"विचार केला पाहिजे. हा संतत रोग आहे, असें समजून त्याप्रमाणें त्याजवर उपचार
"केले पहिजेत.

"राणा उमरावसिंग यानें हा रोग चांगला बरा करून, राज्यकारभाराची व्यवस्था
"आणि न्यायमनसुबी हीं त्यानें उत्तम रीतीनें स्थापित केलीं होतीं.

"राणा संग्रामसिंगाच्या कारकीर्दींत पुनः तो रोगोद्भव झाला.

"त्या रोगोद्भवाचें बीज राणा जगत्सिंगाचे कारकीर्दींत सर्वत्र पेरलें गेलें.

"राणा प्रतापसिंगाचे कारकीर्दींत त्या बीजाला अंकुर फुटून त्याचा वृक्ष बनला.

"राणा राजसिंगाचे कारकीर्दींत त्या वृक्षाला फळें आलीं.

"राणा उरसीच्या कारकीर्दींत तीं फळें पक्वावस्थेला पोंचलीं.

"राणा हम्मीर याचे कारकीर्दींत तीं फळें सर्वांना वांटलीं गेलीं .व त्यांचा भाग
"प्रत्येकाला मिळाला.

"आणि, राणा भीमसिंग महाराज, आपल्या कारकीर्दींत त्या फळांचें सर्वांनीं यथेच्छ
"भक्षण केलें! त्या फळांचा स्वाद आणि गुण आपल्याला पूर्णपणें समजला आहे व
"त्याचप्रमाणें आपल्या ह्या अवघ्या देशासही समजून चुकला आहे. आतां आपण ह्या
"रोगावर जर औषध न द्याल तर निःसंशय त्यापासून होणारें दुःख आपल्याला फार
"जाचील. आणि तेणेंकरून आपल्याविषयीं स्वदेशीं आणि परदेशीं लोकांना फारच
"थोडी कींव आणि अभिमान उत्पन्न होईल. ह्यासाठीं, ह्या रोगमुक्त्यर्थ, कोणत्याही
"प्रकारची हयगय आणि हेळसांड करूं नये. नाहीं तर, आपल्या संबंधाचा जो विश्वास

"व खात्री लोकांचे मनावर आहेत तीं नाहींशीं होऊन, त्याबरोबरच आपलें राज्यही "नष्ट होईल !"

तिसऱ्या एका पत्रांत, त्या वेळीं असलेला दिवाण अगरजी मेहेता[1] यास पुढें लिहिल्याप्रमाणें मजकूर लिहिला आहे:—

"दूध जर विरजलें तर त्याच्या मूळरूपामध्यें तफावत होते खरी; तथापि, त्यामध्यें "फारसें नुकसान झालें असें होत नाहीं. कारण, त्या विरजलेल्या दुधांतून त्याचें मुख्य "सार जें लोणी तें आपल्याला काढतां येतें. त्यामुळें त्यांत कांहीं नुकसान अथवा गैर-"फायदा होतो असें ह्मणतां येत नाहीं. आणि लोणी काढून घेतल्यावर बाकी राहिलेलें "ताक जर फेंकून दिलें तर त्यामध्येंही कांहीं नुकसान नाहीं. परंतु, दुधाला विरजण "लागलें व तें रंगामध्यें काळसर झालें, तर, त्याचा तो ओंगळवाणा रंग जाऊन त्याची "स्वच्छता त्याला परत येईल, अशा प्रकारची कांहीं तरी युक्ति लढवण्यास शहाणपणा अंगीं "असला पाहिजे. अशाच प्रकारचा शहाणपणा हल्लीं आपल्यामध्यें पाहिजे आहे. मेवा-"डची बिघडलेली राज्यस्थिति ही एक विरजण लागलेल्या दुधाचे ठिकाणींच आहे. आणि "त्या विरजलेल्या दुधावर परदेशीयांचा प्रवेश हाच काळा व किळस आणणारा रंग "आला आहे. तर सर्वप्रकारच्या प्रयत्नांनीं व शहाणपणानें तो कृष्णवर्ण घालविला "पाहिजे. परदेशीयांवर जर विश्वसून रहाल तर आपला देश आपल्याला मुकला असें "समजलें पाहिजे !

"चांदण्यामध्यें चंद्रज्योतीच्या उजेडाची काय मातब्बरी आहे ?

"गारोड्याच्या खोट्या व बनावट नाण्याकडे विश्वासानें कोण बघेल ?

"मी पराचें खबूतर करून दाखवितों, असें सांगणाराला तुह्मी मान देऊं नये.

"बाहेरगांवीं व दूरदेशांत असें ह्मणतात कीं, मेवाडांतला शहाणपणा व हुशारी हीं "नाहींशीं झालीं. ही गोष्ट तर मेवाडच्या आजपर्यंतच्या एकंदर नांवालौकिकाला अत्यंत "लाजिरवाणी आहे !"

अमृतराव पांचोली याच्या वर लिहिलेल्या पत्रांतील आशय कशा धोरणाचा आणि कोणत्या प्रकारच्या अभिमानाचा आहे हें कळून येण्यासारखें आहे. राण्याला व त्याचे प्रधानाला अशा प्रकारचीं पत्रें लिहिलीं तरी त्यांचा कितीसा उपयोग होणार होता व किती उपयोग झाला हें वेगळें सांगणें नकोच. हीं पत्रें त्यांच्या दप्तरांत मात्र राहिलीं. ह्यापेक्षां त्यांतील चांगल्या व देशाभिमानाच्या मजकुराचा जास्त कांहीं उपयोग झाला नाहीं ! असो.

ह्याच वेळीं पुण्याकडे महादजी शिंदा वारला व त्याचा पुतण्या दौलतराव शिंदा हा त्याचे जागीं झाला. ह्या दौलतरावानें आपल्या शेणवी सरदारांचे वध केले; व त्याचे महादजी शिंद्याच्या राण्यांचे बरोबर तंटे सुरू झाले. ह्या सर्व गोष्टी

---

१. अगरजी मेहेता याला कोठें कोठें 'उगरजी मेहेता' असेंही ह्मटलेलें आढळतें.

एककाळींच घडून आल्यामुळें इकडे मेवाडचें वजन सहजच वाढण्याचा रंग होता. अंबाजी इंगळे हा, त्याचा यजमान दौलतराव शिंदा हा लहान वयाचा असल्यामुळें, तो जो हिंदुस्थानांत शिंद्याच्या वतीचा सुभेदार बनला होता तो विशेष जोरवान् झाला. अंबाजीचा आणि लखबादादा व महादजी शिंद्याच्या राण्या यांचा बेबनाव होता. लखबादादा व राण्या यांजकडे खिचीचा ठाकूर, दुर्जनसाल आणि दत्तियाचा राजा असे होते. यांत राण्यांचे तर्फेनें दत्तियाचा राजा अंबाजीशीं लढून धारातीर्थी पडला. लखबादादानें राणा भीमसिंग यास एक पत्र लिहिलें कीं, 'आपण अंबाजीला बिलकूल न मानतां त्याच्या तर्फेचे जे अधिकारी आपले दरबारांत असतील त्यांस घालवून द्यावें.' तिकडून अंबाजीनें आपला मुतालीक गणेशपंत यास लिहिलें कीं, 'मेवाडांतून सर्व शेणवी ब्राह्मणं आणि लखबादादाचे पक्षपाती जे कोणी दुसरे लोक असतील त्या सर्वांस काढून द्यावें.' त्याप्रमाणें, गणेशपंतानें राण्याची आणि त्याचे दिवाणाची भेट घेऊन अंबाजीकडून लिहून आलेला मजकूर त्यांस कळविला. तेव्हां बाह्यतः राण्यानें व त्याच्या प्रधानानें गणेशपंताचे ह्मणण्यास ह्मणजे अंबाजीकडून लिहून आलेल्या लेखास आपलें मत असल्याचें कळविलें. परंतु गुप्तपणें त्यांनीं असा विचार केला कीं, शेणवी ब्राह्मणांस अनुकूल होऊन अंबाजीचा अधिकार मेवाडांतून काढून टाकूं. आणि त्यांनीं असा विचार करून शेणवी यांस असें लिहून कळविलें कीं, 'तुह्मी जावद येथून निघून गणेशपंतावर चालून यावें; आह्मी तुह्माला साह्य करण्यास तयार आहों.' त्याप्रमाणें ते आले. त्यांची व गणेशपंताची सावा येथें मुलाकत झाली. त्या वेळीं जी त्यांची चकमक झडली, तींत गणेशपंताचा पराभव झाला व त्याच्या तोफा शेणव्यांनीं घेतल्या. तेव्हां गणेशपंत चितोडास आश्रयासाठीं गेला. तेथें चोंडावतांनीं बाह्यात्कारीं त्याला आश्रय देऊन, पुनः शेणव्यांशीं लढण्याचें उत्तेजन दिलें. त्याप्रमाणें त्यानें पुनः नेट धरून शेणव्यांशीं लढाई दिली. परंतु तींतही त्याचा पराभव होऊन तो हम्मीरगडास पळून गेला. असें झालें तेव्हां मात्र रजपूत गणेशपंताचा पक्ष सोडून त्याचे शत्रु जे शेणवी त्यांजकडे जाऊन मिळाले. आणि त्यांनीं १५००० लोकानिशीं, गणेशपंत जेथें पळून गेला होता त्या हम्मीरगडास वेढा दिला. तेथें गणेशपंत नानानें मोठ्या शौर्यानें आपलें रक्षण केलें. रात्रींबेरात्रीं त्यानें गुप्तपणें रजपुतांवर हल्ले केले. परंतु

---

१. राणा भीमसिंग याचे कारकीर्दीत मेवाडामध्यें शेणवी ब्राह्मण मोठे श्रीमान् व वजनदार सरदार असत. वर लिहिलेले लखबादादा, बाळोबा तात्या, जीवबादादा, शिवाजीनाना, लालाजीपंडित; व यशवंतराव भाऊ ही सर्व शेणवी मंडळी मेवाडच्या राण्याची सावकार असून, त्यांच्याकडेच मेवाडचे महाल वगैरे गहाण असत.

त्याच्या त्या हल्ल्यांत हम्मीरगडचा राजा धीरजसिंग याचे दोघे मुलगे मारले गेले. इतक्यांत अंबाजीनें ठेवलेल्या नवीन कवायती पलटणींतले कांहीं लोक गुलाबराव कदम नांवाच्या एका लष्करी अधिकाऱ्याचे हाताखालीं गणेशपंताला मदत ह्मणून येऊन पोहोंचले. तेव्हां गणेशपंत हम्मीरगडाहून निघून अजमिराकडे गेला. तों त्याजवर चोंडावतांनीं वाटेंत मुसामुसी नांवाच्या गांवीं स्वारी केली; व त्या स्वारीमध्यें त्यांस जय मिळाल्यासारखा दिसत होता. परंतु इतक्यांत, एका घोडेस्वाराची घोडी सुटली; ह्मणून तो मोठ्यानें ओरडून ह्मणाला, 'भागा ! भागा ! (पळाली ! पळाली !)' तों त्याच्या त्या ओरडण्याचा चोंडावतांच्या फौजेंत चोहोकडे जास्त जास्त गलबला वाढत गेला. पुढें मग त्या घोडीला ज्यांनीं पकडलें ते ओरडून ह्मणाले, 'मिल गयी ! मिल गयी ! (सांपडली ! सांपडली !)' अशा दोन्ही प्रकारच्या आरोळ्यांनीं चोंडावतांचे सैन्यांत फारच गोंधळ माजून ते भिऊन पळून गेले. ते आपल्या शत्रूंवर मोठ्या जयाच्या आढ्यतेनें चालले होते; परंतु पुढें त्यांच्यांमध्येंच वरील घोंटाळा उत्पन्न होऊन ते निराशपणें मागें परतले. त्या पळापळींत अनेक लोक मारले गेले व त्यांमध्येंच सिंधी जमादार चंदन हाही मारला गेला. रजपूत जे पळाले ते शहापुरास येऊन पोंचले, तेव्हां त्यांस देवगडच्या[1] ठाकुरानें शहापुराचे दरवाजे उघडून आंत घेतलें; आणि त्यांना आश्रय दिला. चोंडावत रजपूत हे ह्याप्रमाणें भिऊन पळून गेले, हें सुक्तावतांचे पक्षाकडील भाटांनीं पाहून, त्यांच्याबद्दलच्या फजितीचें त्यांनीं खूपच वर्णन केलें आहे. कारण, त्यांचा हा पराजय पाहून तशीं त्यांच्या फजितीचीं वर्णनें त्यांनीं मुद्दाम करून ठेविलीं. असें झालें, तथापि, गणेशपंताची ह्या धामधुमीमुळें अगदीं त्रेधा उडून जाऊन, त्याचा अधिकार पुष्कळच कमी झाला; व उत्तरोत्तर त्याचे ताब्यांतला मुलूखही जात चालला. रजपूत ठाकुरांनीं त्याचे ताब्यांतून आपआपला मुलूख परत घेतला व त्याबरोबरच राण्यानेंही आपले महाल त्याजकडून परत घेतले. ह्या वेळीं मेवाडांत अंबाजी इंगळे व लखबादादा या दोघां मराठे सरदारांचींच भांडणें लागली. त्यांत अंबाजी ह्मणे, 'शिंद्याचा हिंदुस्थानांतील मुतालीक मी;' आणि लखबादादा ह्मणे, 'मी शिंद्याचा मुतालीक.' आणि हें भांडण पुढें दिवसेंदिवस जास्त जास्त वाढतच चाललें. त्यांत लखबाच्या पक्षाला मेवाडचे

१. टॉड् ह्मणतो, 'हा देवगडचा ठाकूर माझ्या वेळेस असून तो माझ्या पुरा ओळखीचा होता. हा फारच उंच होता. त्याची उंची मोजली तों तो पांच हातांवर उंच भरला. तो जसा उंच होता तसाच शरीरानेंही चांगला जाडा होता. त्याचा बापही त्याचेप्रमाणेंच अतिशय उंच व जाडजूड होता. तो तर साडेपांच हात उंच असून शरीरानेंही भव्य होता ! तो अगदी अल्प वयांत ह्मणजे २२व्या वर्षी वारला. त्यानें आपण कृश होण्याकरितां विनाकारण अनेक प्रकारचीं पथ्यें केलीं व अनेक औषधें सेवन केलीं, त्यामुळें तो मेला; असें ह्मणतात.'

सर्व राजे व ठाकूर होते. कारण, त्यांमध्यें त्यांचा स्वतःचा फायदा त्यांना करून ध्यावयाचा होता. गणपतरावनानाकडे हम्मीरगड किल्ला मात्र राहिला. पुढें, त्या गडावर लखबानें हल्ला केला व त्याचे भिंतींवर तोफा चालविल्या. सुमारें दोन हजार गोळा त्या किल्ल्याच्या भिंतींवर मारला गेला असेल; व त्यामुळें लखबादादाला प्रवेश करण्यापुरता मार्ग झाला होता. परंतु इतक्यांत, अंबाजीच्या मुलाचे हाताखालीं बाळाराव इंगळे, बापू शिंदा, यशवंतराव शिंदा, एका युरोपियनाच्या शिकवणीचीं कांहीं कवायती पलटणें आणि कोट्याचा झालिमसिंग याचेकडील कांहीं लोक, अशी मदत गणपतरावनानास येऊन पोंचली. तेव्हां लखबानें आपला वेढा हम्मीरगडाभोंवताल्न काढून चितोडाकडे कूच केलें, व तो गोसुंडा किल्ल्याचा आश्रय करून राहिला. हम्मीरगड आणि गोसुंडा या दोन किल्ल्यांच्यामध्यें बेरीस नांवाची नदीच काय ती असून, त्या नदीचे दोन्ही तीरांवर दोघांच्या फौजा मोर्चे बांधून उभ्या राहिल्या. इतक्यांत, मराठ्यांमध्यें ह्मणजे गणपतराव नाना व बाळाराव इंगळे (अंबाजी इंगळ्याचा भाऊ) या परस्परांत कांहीं भांडण उपस्थित झालें; व त्याचप्रमाणें, त्यांच्या फौजांत पगारांचे बाकीबद्दल वाद निघाला. आणि येणेंकरून, त्यांचे आपसांतच तंटे माजून, गणपतरावाच्या मदतीस आलेली फौज संगानेर नांवाच्या गांवाकडे निघून गेली, मराठ्यांच्या ह्या आपसांतल्या तंट्यांमुळें असें वाटलें कीं, आतां त्यांच्यामध्येंच परस्पर लाथाळी माजून ते एकमेकांच्या नाशास उद्युक्त होतील; व तेणेंकरून रजपुतांचें कल्याण होऊन ते मराठ्यांना एकदां शेवटचें हाकून देतील; ह्मणजे पुनः त्यांचा मेवाडांत प्रवेश होणार नाहीं. परंतु मराठे हे मोठे वस्ताद कारस्थानी होते. त्यांचीं आपसांत भांडणें लागलीं तरी ते तीं न वाढूं देतां, थोडक्यांत आटोपून, ते आपल्या हिताविषयीं कधींही पराङ्मुख नसत. असें होतें तथापि, पुढें इंग्रजांनीं मराठ्यांना आणि रजपुतांना, दोघांनाही, ठिकाणच्या ठिकाणीं बसवून त्यांचे वाद आणि त्यांचीं भांडणें सर्व मोडून टाकिलीं.

वर लिहिल्याप्रमाणें, गणपतरावनाना बाळारावाशीं भांडून संगानेर येथें गेला. तथापि, बाळाराव इंगळे हा आपला पक्ष सोडून स्वस्थ बसला नव्हता. परंतु पुढें, तो गुगूळछप्रा येथें असतां मोठ्या संकटांत पडला होता व त्या वेळीं लखबादादानें त्याला मदत केली होती. त्याचप्रमाणें, बाळाराव यास आपल्या फौजेचा राहिलेला पगार वांटण्यास पैसे पाहिजे होते ते लखबादादानें त्याला वेळेवर दिल्यामुळें, तो त्याचे फार उपकार मानूं लागला. गणेशपंत याचा आणि बाळाराव याचा तंटा होऊन ते दोघे वेगळे झाल्यावर, त्याचप्रमाणें बापू शिंदाही बाळारावाशीं भांडून त्याजपासून वेगळा झाला. असें झालें तेव्हां बाळारावाला लखबादादाशिवाय इतरांचा आश्रय

राहिला नाहींच. गणपतराव जसा पराभूत होऊन एकीकडे जाऊन बसला तसा अंबाजीनें सदरलंड नांवाचा एक युरोपिअन कवायती पलटणांसह गणपतरावाचे मदतीस पाठविला. परंतु त्या सदरलंड साहेबाशींही गणपतरावाचें भांडण झाल्या-मुळें तो परत अंबाजीकडे निघून गेला. तेव्हां अंबाजीनें दुसरा एक शूर जॉर्ज थॉमस नांवाचा युरोपिअन लष्करी अधिकारी त्याचे मदतीस पाठविला. गणपतरावनाना आणि लखबा हे दोघे परस्परांचे वैरी होते; तथापि, राणा त्या दोघांशींही सारखाच असे; गणपतरावनानाकडील वकील आले ह्मणजे त्यांशीं गोड बोले; व लखबादादा-कडील मनुष्यें गेलीं ह्मणजे त्यांशींही मैत्री दाखवी. आणि असें केल्यावांचून राण्याला गत्यंतरच नव्हतें. कारण, त्या दोघांच्याही फौजा त्याच्या दृष्टीपुढें पावसाळ्यांत दीड महिना दोन बाजूंना उभ्या होत्या[1].

इकडे खिची दुर्जनसाल आणि मेवाडचे रजपूत सरदार यांनीं पांचहजार स्वारांनिशीं गणपतरावाचे गोटास वेढा दिला, आणि त्याला अंबाजीकडून जी मदत यावयाची होती ती बंद करण्यासाठीं सर्व रस्ते रोंखून धरिले. परंतु जॉर्ज थॉमस या युरोपिअन सरदारानें हल्ला करून दुर्जनसालाचे व रजपुतांचे प्रयत्न व्यर्थ केले; आणि तो तसाच पुढें लखबावर चालून गेला. इतक्यांत मोठें थोरलें वादळ होऊन, जिकडे तिकडे पाऊस पडला आणि नद्यांओढ्यांस मोठमोठाले पूर येऊन, थॉमस याचीं पलटणें मुख्य फौजेपासून तुटल्यासारखीं झालीं. असें जेव्हां झालें तेव्हां अर्थात् गणपतरावाला कोठचा धीर निघणार ? पावसाच्या अतिवर्षावानें आणि वादळानें त्याचें आश्रयस्थान जें शहापूर तें तर जिकडे तिकडे अगदीं जलमय होऊन गेलें. ही संधि राखून लखबानें मेवाडच्या रजपूत सरदारांचे मदतीनें थॉमस साहेबाचा जो तोफखाना तेथें राहिला होता तो हल्ला करून आपल्या कबजांत घेतला. त्यामध्यें त्याला १५ तोफा मिळाल्या. शहापूरचा ठाकूर हा ह्या वेळीं अगदीं असहाय झाला होता. पावसाच्या धूमधडाक्यानें आणि त्याच्या इतर रजपूत सरदारबांधवांच्या पुढें सरण्यानें तो अगदीं घाबरा होऊन गेला होता; आणि ह्यामुळें पुढें त्यानें गणपतरावनानाला कोणत्याही प्रकारचें साह्य अथवा आश्रय देण्याचें अगदींच नाकारलें. तेव्हां मात्र त्याला अगदीं नाइलाज होऊन शहापुराहून निघून जावें लागलें. व तो तेथून निघून संगानेर येथें पुन: जाऊन राहिला. शहापूरचा राजा लखबा यास मिळाला[2]. ही गोष्ट वि० सं० १८५६ ह्मणजे इ० स० १८०० ह्या वर्षी झाली.

---

१. ह्या दोन्ही फौजा बनास नदीच्या उजवे काठावर उभ्या होत्या; लखबादादाची फौज शहापुरापासून ५ कोसांवर अमली नांवाच्या ठिकाणीं असून, गणपतरावाची फौज कदैरा नांवाच्या गांवीं होती.

२. लखबादादानें शहापूरच्या राजास राण्याचे परवानगीनें जहाजपूर येथील बंदोबस्ताचे कि-

येणेंप्रमाणें गणपतरावनाना जरी पळून असहाय झाला, तरी मागाहून अंबाजीनें त्याला आणखी मदत पाठवून उत्तेजन दिलें. आणि तो पावसाळा संपल्यावर त्यानें पुनः कत्तली, लुटालुटी, वगैरे चालवून आपला सूड उगविण्यास सुरुवात केली. अरवली डोंगराचे पायथ्याशीं असलेल्या चोंडावतांच्या सर्व जाहगिरी वगैरे गणपतरावानें घेऊन, कित्येक ठिकाणें तर अगदीं उजाड करून टाकलीं. शिवाय, त्यानें चोंडावतांवर पुष्कळ खंडणीही लादिली आणि त्यांचे किल्ले स्वाऱ्या करून घेतले. थॉमस यानें देवगड आणि अमाइत ह्या दोन किल्ल्यांवर स्वारी केली व त्या दोन्ही ठिकाणीं लढाया झाल्या; आणि अखेरीस त्यांजवर त्यानें खंडणी बसविली. त्याचप्रमाणें, कासीतल व लुसानी हे दोन किल्लेही त्याचे ताब्यांत आले. ह्याप्रमाणें, गणेशपंताकडून मेवाडांत दांडगाई चालली असतां, इतक्यांत शिंद्याकडून अंबाजीला बर्तर्फी मिळाली; आणि त्याचे जागीं त्यानें लखबादादाला आपला हिंदुस्थानांतील मुतालीक ह्मणून नेमिलें. असें झालें तेव्हां अर्थात् गणेशपंतनाना यास, आपण काबीज केलेले सर्व किल्ले वगैरे लखबादादाचे ताब्यांत देणें प्राप्त झालें. अंबाजीला बर्तर्फी मिळून त्याचे जागीं लखबादादा शेणव्याची नेमणूक होण्यास कारण, त्या वेळीं शिंद्याचे पदरीं बाळोबातात्या आणि बक्षी नारायणराव हे दोघे शेणवी मुख्य मंत्री आणि दिवाण होते. तेव्हां त्यांनीं आपल्या जात्यभिमानाप्रमाणें हिंदुस्थानांतली मुतालकी मराठ्यांकडून काढून शेणव्याकडे दिली, हें उघडच आहे.

ह्या वेळेपासून शिंदा मेवाडास आपलें खंडणीदार राज्य असें ह्मणूं लागला. येथपर्यंत आह्मी, मराठ्यांचा कसा उदय झाला आणि त्यांचें मेवाडांत कसें वजन बसत आलें, हें विस्तारेंकरून लिहिलें. वि० सं० १८२६ पासून १८३१ पर्यंत त्यांजकडे मेवाडचे महाल खंडणीकरितां लावून दिले होते ते त्यांनीं तसेच वि० सं० १८४८ पर्यंत आपल्याकडे दाबून ठेविले आणि द्रव्याशा तृप्त करून घेतली. पुढें साळुंब्र्याच्या राजानें बंड केल्यावरून चितोडास शिंद्याचें येणें झालें; आणि शिंद्यानें अंबाजीला आपला मुतालीक नेमून दक्षिणेकडे कूच केलें. शिंदा गेल्यानंतर अंबाजीनें शिंद्याच्या मुद्दाम राखून ठेवलेल्या फौजेसहवर्तमान राण्याचे गेलेले मुलूख मिळवून देण्याचा उद्योग चालविला. त्या संबंधानें अंबाजीनें आपला क्रम कसा काय ठेविला होता; त्यानें मेवाडच्या संपत्तीवर किती लक्ष्य देऊन ती जिंकून मि-

---

ल्ल्यांत नेऊन सुरक्षितपणें राहूं दिलें. ह्या किल्ल्यांत राहण्याविषयीं राण्यानें लखबादादास परवानगी दिली खरी; परंतु लखबानें त्या राजापासून दोन लाख रुपये राण्याला न कळवतां उपटले व त्यामुळें रजपूत सरदारांस लखबाचा तिरस्कार आला.

ळवेल तिकडून कशी मिळविली; त्यानें आपल्याला बहुतेक हिंदुस्थानचा स्वामी असें ह्मणविण्याची किती खटपट केली; चोहोंकडे आपल्या वतीनें मुख्त्यार नेमून सर्व देश आपल्या ताब्यांत राहण्याविषयीं कसा यत्न चालविला होता; त्या मुख्त्यारामुख्त्यांत भांडणें माजून मेवाडांत तंट्याबखेड्यांचें एक खूळच कसें बनलें व त्यामुळें तिकडील लोकांत अशांति व असुख कसें उत्पन्न झालें; आणि झालिमसिंगाच्या गुप्त व कपटी हेतूनें सुक्तावत कसे चेतले जाऊन त्यांनीं अंबाजीचा कसा आश्रय केला, व त्यामुळें चोंडावत हे लखबादादाला मिळून त्यांनीं अखेरीस अंबाजीवर आणि सुक्तावतांवर आपली कशी छाप बसविली; ह्या सर्व गोष्टींचें येथपर्यंत साक्षात् आणि पर्यायानें विस्तारपूर्वक वर्णन करण्यांत आलें आहे. त्यावरून वाचकांस बऱ्याच प्रकारानें मेवाडांतल्या त्या वेळच्या एकंदर स्थितीचें अनुमान होईल. अंबाजी आणि लखबा यांचे मधील आपसांतील वैमनस्यामुळें बिचाऱ्या अभागी राण्याला व त्याचे देशांतील एकंदर लोकांना मात्र सर्व प्रकारें द्रव्य, सुख व शांतीच्या संबंधानें बहुत चट्टा लागला. शिंद्यानें आपलें मोठें थोरलें लष्कर अंबाजीच्या ताब्यांत देऊन, त्याला कोणत्याही प्रकारची विशेष कामगिरी वगैरे न सांगतां, केवळ, येवढ्या लष्कराचे पोषणाचा खर्च परस्परें भागावा ह्मणून तें मेवाडांत सोडून, आपण निर्वेधपणें दक्षिणेकडे चालता झाला. येणेंकरून शिंद्याचा मात्र चांगला फायदा झाला. येवढें लष्कर, आपल्या पदरचा एक पैसाही न खर्चतां तें आपल्या मालकीचें असें शिंदा मानून होता; व त्या लष्कराचा त्याला वाटेल तेव्हां वाटेल तसा उपयोग करून घेण्याची मुखत्यारी होती. असो.

नवीन नेमलेला मुतालीक लखबा यानें मेवाडाकडे कूच केलें. नंतर त्यानें तिकडे राण्याचे प्रधानाच्या जाग्यावर अगरजी मेहेता याची नेमणूक केली, आणि चोंडावत रजपुतांचा पक्ष पुन: सबळ झाला. लखबानें शहापूरच्या ठाकुरावर सहा लक्षांची खंडणी बसविली व त्या रकमेकरितां जहाजपूर परगणा आपलेकडे घेतला; आणि त्या परगण्यांतील ३६ गांव गहाण टाकून आपली रक्कम वसूल करण्याची हिकमत योजिली. झालिमसिंगाचें बरेच दिवसांपासून जहाजपुरावर लक्ष्य होतें. ह्मणून त्यानें लखबाचा, तो परगणा गहाण टाकण्याचा हेतु बदलून, तावडतोब त्याला ती रक्कम भरली व जहाजपुर व त्यांतील गांवें आपल्या ताब्यांत घेतलीं. लखबानें मेवाडावर २४ लाख रुपये खंडणी आकारून, त्याप्रमाणें ती त्यानें शस्त्राचे जोरानें वसूल केली; आणि नंतर तो मेवाडांतून जयपुराकडे गेला. जातांना त्यानें आपला मुख्त्यार ह्मणून यशवंतरावभाऊ यास मेवाडांत ठेविलें. राण्याचा प्रधान अगरजी मेहेता याचे हाताखालीं मौजीराम या नांवाचा एक दुय्यम प्रधान होता; त्यानें गु-

रोपियन लोकांच्या धाटावर मेवाडांत कवाइती फौज तयार करण्याचें काम चालविलें. कारण, त्या वेळीं कवाइती फौजेविषयींची अभिरुचि हिंदुस्थानांतील एकंदर राजांस फार लागली होती. ह्याप्रमाणें प्रधान अगरजी मेहेता आणि त्याचा दुय्यम मौजीराम यांनीं कवाइती फौज तयार करण्याचा यत्न चालविला खरा; परंतु तो यत्न राण्याचे दरबारी सरदारांस बिलकूल मान्य झाला नाहीं. व प्रधान अगरजी यानें जेव्हां ह्या कवाइती फौजेच्या व तिचे तोफखान्याच्या खर्चास वगैरे पैसा मागितला, तेव्हां सर्व सरदार नाखुष होऊन, त्यांनीं अगरजीला एकदम कैद केलें; व त्याचे जागीं पूर्वींचा प्रधान सतीदास याला पुनः प्रधान नेमिलें; आणि त्याचा भाऊ शिवदास कोट्याला होता त्यालाही उदेपुरास बोलावून आणिलें. राण्याचे सरदारांस विलक्षण प्रकारचा देशाभिमान असल्यामुळें, त्यांनीं प्रधान अगरजी मेहेता यानें योजिलेली कवाइती फौज तयार करण्याची कल्पना, परदेशीय आहे येवढ्याचमुळें, नाकारली; आणि त्यामुळें त्यांचा त्याचेवर रोष झाला. यावरून, त्या दरबारच्या सरदारांच्या तबियती कशा काय होत्या त्या बघून त्या धोरणानें आपला कारभार ठेवणें हें मोठ्या जोखमीचें काम होतें, ह्यांत संशय नाहीं.

इ० स० १८०२ ह्या वर्षी शिंद्याचें आणि होळकराचें वांकडें पडून इंदुरास लढाई झाली. ह्या लढाईला दोनही पक्षांची दीड लाख फौज होती. ह्या लढाईमध्यें शिंद्याला जय मिळून, त्यानें होळकराच्या तोफा घेतल्या व होळकराची राजधानीही शिंद्याचे ताब्यांत गेली. तेव्हां होळकर पळून मेवाडांत गेला. त्याबरोबर त्याचे मागें शिंद्याची फौजही लागली. शिंद्याच्या फौजेचे मुख्य त्या वेळीं सदाशिवराव व बाळाराव हे दोघे सरदार होते. होळकरानें पळतां पळतां रतलाम लुटलें आणि भैंदरच्या सुक्तावत राजापाशीं तो खंडणी मागूं लागला. परंतु पाठीवर शिंद्याची फौज होती ह्मणून त्याला ती खंडणी वसूल करण्यास फुरसत सांपडली नाहीं. तेव्हां तो तसाच पुढें नाथद्वारास गेला. नाथद्वारा हें हिंदुलोकांचें प्रसिद्ध देवस्थान आहे हें सर्वांस माहित आहेच. नाथद्वारास गेल्यावर त्याला वेड लागल्यासारखें झालें. त्यानें नाथद्वाराच्या देवापुढें (हा देव श्रीकृष्णाची मूर्ति आहे.) साष्टांग नमस्कार घातला; आणि नंतर हात जोडून त्याचे पुढें उभा राहिला व आपल्याला अपयश आलें ह्मणून त्यानें देवाला यथेच्छ शिव्या दिल्या! पुढें त्यानें त्या देवाच्या पुजाऱ्यांवर आणि नाथद्वाराच्या रहिवासी लोकांवर तीन लाख रुपये खंडणी बसविली व ती वसूल होईपर्यंत त्यानें कित्येक पुजारी व लोक ह्यांस पकडून आपले गोटांत नेलें. असें झालें तेव्हां नाथद्वाराचा मुख्य पुजारी दामोदरजी यानें, त्या व्रजाधीशाची (श्रीकृष्णाची) मूर्ति राखली जावी आणि या लुटारू व बदमाष लोकांपासून देवाचें पावित्र्य रक्षावें

ह्मणून, त्याचे संस्थानासुद्धां उदेपुरास देवाची रवानगी करून दिली. हें काम कोटा-रियोच्या चव्हाण राजानें करण्याचें पतकरिलें. हा चव्हाण राजा राण्याच्या दरबारांतील सोळा मंत्र्यांपैकीं एक होता. त्यानें वीस घोडेस्वारांबरोबर श्रीनाथजीची मूर्ति चोरून उदेपुरास सुरक्षितपणें रवाना केली. नाथजीच्या देवस्थानास मुसलमानांकडून भीति होतीच; व त्याचप्रमाणें मराठे हे हिंदु असून त्यांजकडूनही भीति होतीच. तेव्हां अशा दोघांही लुटारूंच्या हल्ल्यांतून आपल्या देवस्थानाचा बचाव करणें नाथद्वाराच्या लोकांस भागच होतें. चव्हाण राजाचे घोडेस्वार श्रीनाथजीच्या मूर्तीस उदेपुरास पोंचवून परत येत असतां त्यांस होळकराचे लोक भेटले, व त्यांनीं त्यांचा अपमान करून त्यांचे घोडे मागितले. परंतु चव्हाण राजा हा प्रसिद्ध शूर व योद्धा जो पृथ्वीराज चव्हाण याचा वंशज असल्यामुळें त्यानें, अशा रीतीनें अपमान सोसून त्या लुटारूंच्या स्वाधीन घोडे करावयाचे त्यापेक्षां, त्यांशीं लढाई करून धारातीर्थी पडावें असा निश्चय केला; आणि, त्या निश्चयाप्रमाणें, त्यानें आपल्या लोकांना आपल्याप्रमाणेंच करण्यास सांगून एकदम शत्रूंवर चाल केली. त्या लढाईमध्यें चव्हाण राजा व त्याचे लोक मारले गेले. ह्या धामधुमीच्या वेळीं इतिहासांत लिहिण्यासारखीं जीं कित्येक रजपूत राजांकडून अभिमानाचीं व शूरत्वाचीं कामें झालीं आहेत त्यांत कोटारियोच्या चव्हाण राजाकडून जें वर लिहिलेलें कृत्य घडलें तें एक, अत्यंत प्रशंसनीय आहे ह्यांत शंका नाहीं. कांहींही होवो; लुटारू लोकांस अशा धामधुमी करून पैसा मिळविण्यास चांगलें फावतें, व त्याप्रमाणेंच होळकरालाही लुटालूट करण्यास चांगली संधि मिळाली. पुढें नाथद्वारा सहा महिनेपर्यंत अगदीं उजाड पडलें होतें. श्रीनाथजीची मूर्ति उदेपुरास नेऊन ठेविली होती खरी. परंतु, तेथेंही तिच्या सुरक्षतेबद्दल राण्याला खात्री नसल्यामुळें, त्यानें ती मूर्ति उदेपुरापासून जवळच गासयार नांवाचा डोंगर आहे त्या डोंगरांत नेऊन ठेविली; व तेथें श्रीनाथजीचा मुख्य पुजारी दामोदरजी हा जाऊन राहिला. पुढें दामोदरजी यानें आपल्या देवाचे रक्षणासाठीं त्या डोंगरावर एक मजबूत किल्ला बांधिला, व राण्याकडून त्या मूर्तीचे रक्षणार्थ चारशें स्वारांची तैनात नेमून देण्यांत आली. येणेंप्रमाणें, नाथद्वाराचें संस्थान त्या डोंगरावरच झालें व तेथूनच त्या संस्थानाखालीं मोडणाऱ्या लहान संस्थानांवर पुजारी दामोदरजी हा देखरेख ठेवूं लागला.

आतां इकडे होळकर काय करीत होता तें पाहूं. तो नाथद्वाराहून लुटालूट करून निघाला तो बनेरा व शहापूर या संस्थानांवर खंडणी लादून अजमिरास गेला. होळकराला एक प्रकारचें वेड लागलें होतें असें ह्मणण्यास येथें विशेष कारण घडलें.

---

१. नाथद्वारा हें स्थान उदेपुरापासून एक मजल (१२ कोसांवर) आहे.

नाथद्वाराहून श्रीकृष्णाचे भक्तमंडळीकडून जी संपत्ति त्यानें लुटून आणली होती ती त्यानें अजमीर येथील ख्वाजापिराचे मुंजावरांस वांटून खैरात केली. यावरून बघा. स्वतः हिंदु असून व हिंदुदेवस्थानांतून पैसे लुटून आणून ते परधर्मी मुसलमानांना वांटून देण्यांत त्याला काय भूषण वाटलें असावें ? असो. पुढें अजमिराहून तो जयपुरास गेला. होळकराचे मागें शिंद्याची फौज लागली होती ती त्याचा पाठलाग करीत उदेपुरापर्यंत आली आणि नंतर तेथून परतली. परंतु ती उदेपुरापर्यंत आली तेवढ्यानें उदेपुरावर केवढें संकट गुदरलें बघा. शिंद्याचा मुक्काम उदेपुरास झाला मात्र; तों त्यानें राण्यावर तीन लाख रुपयांची मागणी लाविली. राण्याचे खजिन्यांत शिलक नव्हती ह्मणून त्याला आपल्या जामदारखान्यांतल्या कित्येक वस्तु आणि खुद्द राणीच्या अंगावरील दागिने विकून, ह्या आगंतुक संकटाचें निवारण करावें लागलें. इतक्यांत मेवाडचा सुभेदार यशवंतराव भाऊ याजकडून राण्याकडे आपली शिरस्त्याप्रमाणें खंडणीची यादी आली व त्याप्रमाणें वसूल करण्याचें काम त्यानें आपला दुय्यम सुभेदार तात्या याजकडे सोंपविलें. तेव्हां त्यानें अर्थात् मेवाडांत मोठा दंगा माजवून ती खंडणी वसूल केली. ह्या दंग्यामध्यें मेवाडच्या सरदारांचे व जाहगिरदारांचे जिंदग्यांच्या लुटालुटी झाल्या; शेतकरी लोकांचे छळ झाले; त्यांचीं गुरेंढोरें जप्त करण्यांत आलीं; व त्यांजपासून जुलमानें पैसे काढले गेले; आणि, ज्यांचेपाशीं पैसे नव्हते त्यांना आपल्या जीवाचे बचावाकरितां आपला मुलूख सोडून देशांतरीं लपत व भटकत फिरावें लागलें !

ह्याच वेळीं, ह्मणजे इ० स० १८०२ (वि० सं० १८५९) ह्या वर्षी, प्रसिद्ध लखबादादा हा मृत्यु पावला. त्याजवर शेवटीं त्याचा यजमान् शिंदा याची गैरमर्जी होऊन, त्याजकडून त्याचा फार अपमान झाला होता; व ह्मणून, तो साळुंब्रा येथें आश्रय करून होता. लखबादादा मेल्यावर त्याचे जागीं अंबाजीचा भाऊ बाळाराव हा आला, व त्याला सुक्तावत आणि त्यांचा दिवाण सतीदास हे सर्व मिळाले. सुक्तावतांनीं आणि सतीदासानें आपला अंमल राण्यावर चांगल्या रीतीनें बसावा ह्मणून अगोदरच चोंडावतांस हुसकून दिलें होतें. झालिमसिंग याचेही मनांत पहिल्यापासून चोंडावतांविषयीं द्वेष असल्यामुळें व त्याला पुढें एक आत्महिताचें काम साधावयाची इच्छा असल्यामुळें, तोही वरील बाळारावाचे व सुक्तावतांचे कटांत मिळाला. आणि त्या सर्वांनीं मिळून, चोंडावतांनीं आपल्या तर्फे जो देवीचंद नांवाचा दिवाण राण्याकडे नेमून दिला होता त्यास कैद केलें. बाळाराव इंगळे ह्यानें पुढें चोंडावतांच्या जाहगिरी वगैरे मोठ्या क्रूरपणानें लुटल्या व खराब केल्या. व त्यामुळें चोंडावतांनींही आपला पराक्रम कसा काय आहे तो दाखवि-